# अनुक्रमणिका





अरविंद गोखले
**यांचे कथासंग्रह**

नजराणा
जन्मखुणा
उन्मेष
तनुजा
माहेर
मीलन
जागरण



# कवडसा

बकुळा बारटक्केनें सुषमा चौधरीचे दोन्ही दंड धरून म्हटलें, "सांग, सारं मोकळेपणीं सांग ! इथं माळ्यावर कुणी येणार नाहीं. बैस इथं, बैस ना–"

मोडकळीस आलेल्या माळ्यावर वांकून उभ्या असलेल्या सुषमा चौधरीनें चोंहीकडे पाहिलें. आजूबाजूला रचलेलीं मोठालीं जुनाट भांडीं, पुस्तकांची रद्दी, फाटक्या गाद्या, गंजलेली तीनचाकी सायकल, टोपल्यांतलीं खेळणीं— साऱ्या वस्तूंवर तिची भारावलेली नजर फिरली. सकाळच्या उन्हांत गजबजलेल्या मंडईतून एकाएकीं ह्या काळोख्या माळ्यावर आल्यानें तिची धडधडणारी छाती अधिकच वरखालीं होऊं लागली; आणि तिच्या डोळ्यांत जमलेला गढूळपणा अधिकच गडद झाला. हातांतली भाजीची पिशवी खालीं ठेवीत ती सतरंजीवर बसली.

"तू आनंदानें बावरली आहेस कीं भीतीनें भेदरली आहेस, तेंच समजत नाहीं मला–" बकुळा बारटक्के तिच्या पुढ्यांत बसून म्हणाली. "मंडईपासून पांच पावलंहि दूर नाहीं माझं घर, पण किती दमलेली दिसते आहेस." बकुळा तिच्याकडे विस्मयानें व वात्सल्यानें पहात म्हणाली, "घाम पूस तो आधीं, अन् स्वस्थपणें सांग.–"

साडीचा पदर पुढें ओढून सुषमेनें कपाळावरचा व कानशिलापासचा घाम टिपला. मंडईत ती घटना घडल्यावर ती धांवतच मैत्रिणीकडे आली. आपल्या मनांतला कल्लोळ तिला नीट सांगतां येईना म्हणून माळ्यावर आली. पण आतां मैत्रिणीच्या पुढ्यांत व माळ्यावरच्या एकांतात तिचं मन माघार घेऊं लागलं. तिला वाटलं, कांहीं सांगूं नये वेड्यासारखं; इथें आलों तोच मूर्खपणा झाला—

सुषमेचा स्वस्थपणा बकुळेला सहन होईना. कांहींतरी आश्चर्यकारक, आकर्षक ऐकायला मिळणार म्हणून बकुळा अगदीं आतुर झाली होती. तिच्या अंगावर कांटा फुलला होता व न पाहिलेल्या त्या उमद्या तरुणाचा

चेहरा ती मनाशीं चितारीत होती. पण सुषमा गप्प होती. शून्यपणें कौलारांतून उतरलेल्या सूर्यप्रकाशाच्या कवडशाकडे पहात होती.

तिला पुन्हां फुलवण्याकरितां बकुळा म्हणाली, " तोच ना ग तो—सहा महिन्यापूर्वी तूं नाशकाला जात होतीस तेव्हां तुला भेटला होता तो ? तूं बायकांच्या डब्यांत एकटी होतीस हें पाहून एक मवाली आंत शिरला, अन् हें लक्षांत येऊन शेजारच्या डब्यांतून गाडी चालू असतांना तो तुझ्या डब्याशीं आला नि त्या मवाल्याला त्यानं धरलं ! तूं परत आल्यावर सांगत होतीस हें. तोच ना तुला सोडवणारा, वांचवणारा तरुण ? "

तोच तो !—बकुळेचे बोल ऐकतांच शांत होऊं पहाणाऱ्या सुषमेची नजर धगधगूं लागली. तिचा श्वासोच्छ्वास वेगानें वाढूं लागला व तिच्या हृदयांत तुफान माजूं लागलें. तिला आगगाडींतली घडामोड आठवली. परत ती वेडीपिशी झाली. बकुळेचा हात घट्ट धरीत चोहोंकडे पाहूं लागली.

सुषमेच्या शरीरावर कांटा फुललेला पहातांच बकुळा बहरली. तिचं गुपित ऐकायला आतुर झाली. म्हणाली,

" सगळं सांग बाई ! त्या घडामोडीनंतर कांहीं बोलली नव्हतीस अन् आज एकदम त्याचं नांव घेत आलीस. आज काय घडलं–केव्हां केव्हां भेटला होता तो ?--"

" सांगतें ग ! सगळं सांगतें, म्हणजेच तुला कळेल माझं मन ! " सुषमा कोपऱ्यांतल्या भांड्यांच्या ढिगाकडे पहात भावनावश होऊन म्हणाली. आपल्या मनांत माजलेला कल्लोळ कुणा समजुतदार सखीजवळ मोकळा करायला ती आतुर झाली होती. पण कसं नि कुठून सांगायचं तेंच तिला क्षणमात्र समजेना. बकुळा हंसणार तर नाहीं ? कुठें बोलणार तर नाहीं ना ? सुषमा बराच वेळ विचार करीत राहिली. पण त्या अंधेऱ्या माळ्यावर मोठाल्या भांड्यांकडे पहात मूकपणें बसणं तिला अधिक भीतिदायक वाटलं. पिशवींतली कोथिंबीर, टमाटो, फुलकोबी चांचपीत ती जराशानें सांगूं लागली,

" तोच तो ! नाशकाला जातांना गाडींत भेटला होता, धांवून आला होता, त्याचीच गोष्ट सांगतें...प्रवासांतल्या त्या प्रसंगानें मी तेव्हां इतकी भेदरलें होतें कीं त्याच्याशीं, माझ्या उपकारकर्त्याशीं, धडपणें बोलणंसुद्धां

मला सुचलं नाहीं. त्या गुंडाला त्यानें धरलं नि गाडी थांबतांच पोलिसांच्या स्वाधीन केलं. इतक्या लोकांत मला त्याच्याशीं धड बोलतांहि आलं नाहीं. नाशकाला मी उतरलें तेव्हां मात्र त्याच्याजवळ गेलें. पण 'थँक्स' ह्या एका इंग्रजी शब्दाशिवाय अधिक कांहीं बोलायचं मला सुचलं नाहीं. अधिक काय बोलायचं असतं, तेंहि मला माहित नव्हतं. इंग्रजी उपचार, मराठी नमस्कार ! झालं. तोहि मोकळेपणीं हंसला नि चांचरत 'कसचं-कसचं' म्हणाला. माझी कृतज्ञता नि त्याचा मोठेपणा असा दाखवला गेला नि मग आम्ही दुरावलों. मी फलाटाबाहेर आलें, तो डब्यांत शिरला..."

सुषमा जराशी थांबली. पुढें काय मागायचं हें शोधूं लागली. बकुळा तेवढ्यांत म्हणाली,

"पण तूं पधरा दिवसानीं नाशकाहून परतल्यावर हें सारं आम्हांला सांगितलंस, तेव्हां म्हणालीस कीं पेपरमध्यें ह्याबद्दल रेलवेवर टीका आली आहे; त्यानं लिहिली आहे. त्याची-तुझी भेट नव्हती तर— "

"तें मीं तर्कानें सांगितलं. तो फलाटावर इतर प्रवाशांना म्हणत होता, कीं वर्तमानपत्रांतून दिलं पाहिजे रेलवेविरुद्ध. नागपूरच्या पेपरला तो पत्र लिहिणार होता. म्हणून मी बोललें तसं. अन् अशोककुमार हें नांव सांगितलं ना त्याचं, तें त्याच्या स्नेह्यानें हांक मारल्यामुळे कळलं मला.—"

"नांव नव्हतं सांगितलंस तेव्हां !—पण नांव छान आहे, नाहीं ?— दिसायला कसा आहे ग ?"

"अग-सिनेमांतल्या अशोककुमाराइतका सुंदर आहे !"

उत्सुकतेनें अन् उत्साहानें मोठे झालेले बकुळेचे डोळे चमकूं लागले. पण सुषमेला वैषम्य वाटेल म्हणून ती आपला आनंद आंवरून म्हणाली, "पुढं सांग ना—"

"त्यानंतर तीनएक महिन्यांनीं इथें फुलांचं प्रदर्शन भरलं होतं तें पाहायला आम्हीं गेलों होतों. मी, बेबी, वासंती, वहिनी, दादा, आई नि बाबा. खूप गर्दी होती रविवार असल्यानं. रेंगाळत जात आम्ही हरतऱ्हेचीं छानछान फुलं पहात होतों. दादा प्रत्येक ताटव्याशीं नि गुच्छाशीं थांबून माहिती सांगत होता, नि माझ्या कडेवर बसलेली बेबी धांवूं पहात होती. अशा

थाटांत जात असतांना दूरच्या एका कुंजाशीं तो मला अचानक दिसला ! ओझरता पहातांच मी त्याला ओळखलं, नि आनंदून गेलें. मी गर्दीतहि त्याच्याकडे नजर लावून होतें. अमळशानें त्यानेंहि माझ्याकडे पाहिलं. तो हंसला, मी हंसलें. तो पुढें येत असल्याचं पाहून मीहि सामोरी निघालें! त्याच स्वागताच्या, आपलेपणाच्या, आदराच्या नि कृतज्ञतेच्या भावनेनं ! तेवढ्यांत बेबीनं कांहींतरी दाखवायला म्हणून माझे केस ओढले. तिच्या दांडगाईनें माझी मान लचकली. मी वळून पाहिलं तों आमची शेजारीण ! बेबी तिच्याकडे माझं लक्ष वेधू पहात होती. मला मग त्या शेजारणीशीं बोलावं लागलं. तेवढ्यांत बाबांचा हुकूम सुटला, ' तें डेलियाचे गुच्छ पाहूं या ! ' ह्या सर्वांतून सुटून मी पहातें तों तो कुठेंच दिसेना ! मला वाईट वाटलं. मला त्याची नि बाबांची, दादांची ओळख करून द्यायची होती. पण तोहि त्या बेसुमार गर्दीत बेपत्ता झाला. मग आम्हीं घरीं येतांना मी बाबां-जवळ ' तो दिसला होता ' हें बोललें. बाबांनाहि चुटपुट वाटली. त्याला चहाला बोलावून आभार मानावे, आशीर्वाद द्यावा, शाबासकी द्यावी अशी त्यांची इच्छा होती. आईला मात्र बाबांचा बेत रुचला नव्हता. ती तुटकपणें म्हणाली, ' कशाला उकरून काढायच्या त्या गोष्टी ? —त्याची ओळख म्हणजे आपल्या सुशीवर संकट आल्याची जळती खूण !— करायचं काय बोलावून ? ' मला आईचा फारफार राग आला...अन् रात्रीं झोपेंत तो तरुण किंवा तो मवाली दिसायच्या ऐवजीं आईच्या उद्गारांच्या तालावर आग-गाडी धावत असल्याचंच दिसत राहिलं–"

दम लागल्यानें सुषमा थबकली. भडाभडा ती बोलत होती आणि शब्दांतला खोचदारपणा अपुरा वाटून कीं काय एका हातानें पिशवींतली काथिंबीर नि फुलकोबी खुडीत राहिली होती बोलणं थांबल्यावर तिच्या हाताचा चाळाहि थांबला. कुठेंतरी तरळणारी दृष्टि बाजूच्या तीनचाकी सायकलीच्या सांगाड्यावर स्थिरावली. त्यालाच जणूं उद्देशून ती बोलूं लागली,

" मग मी सारंच विसरून गेलें. आठवण्यासारखं, हुरहूर लागण्यासारखं कांहीं नव्हतं. मी हंसून त्याला प्रत्युत्तर दिलं होतं, मान राखला होता,

झालं ! आणिक काय करायचं ? चहा-फराळाला मी कोण बोलावणार ? आईबाबांचं तें काम ! अन् तो धडपणें भेटला नाहीं त्याला कोण काय करणार ?-अन् अगदीं चहाच दिला पाहिजे असं कुठं होतं ? बक्षि-साच्या आशेनं कांहीं त्यानं केलं नव्हतं. अन् कुठलीहि देणगी अपुरी वाटावी असेच उपकार होते त्याचे—"

"पण—पण—" बकुळा मध्येंच म्हणाली, "त्याला पत्र पाठवून पुन्हा आभार मानावेसें नाहीं वाटले तुला ?—निदान रोज निजतांना देवाला नमस्कार करतेवेळीं त्याचंहि तुला स्मरण नाहीं झालं ?— "

बकुळेच्या स्वप्नाळू डोळ्यांकडे बावरून पहात सुषमा म्हणाली, "त्याचं स्मरण होई-खूपदां होई ! पण रात्रीं त्याची आठवण न आणण्याची मी उलट खबरदारी घेई. कारण-कारण मग ती आगगाडींतली घटना आठवे, तोंड कडू होई, मनांत भीति वाटे. वाईट स्वप्नें पडत. सारखी आगगाडी चालली आहे नि मवाली लोक डब्यांत चढताहेत असं दिसे ! —कधीं दिवसां आठवण येई त्याची !—पण पत्र कशाला लिहायचं ?"

बकुळा बोलली नाहीं. पत्र कशाला व कसं लिहायचं हें तिला सुचत होतं. पण तिलाहि त्या स्वप्नाचं भय वाटत होतं. भयचकितपणें ती ऐकतच राहिली.

"खरं म्हणजे मी हळूहळू सारं विसरून गेलें. त्या विस्मृतीनें माझं मन पुन्हा निर्धास्त, खेळकर झालं. त्यांतून मी नुकतीच कॉलेजांत गेलेली. सकाळीं कॉलेजचं नवलाईचं वातावरण नि संध्याकाळीं नव्या घेतलेल्या सायकलीवरून भ्रमण !—

"मग एकदां कुसुम शिंदे, सुधा साठे, रुबी सालोमन नि मी सायकली-वरून सिनेमाला जायला निघालों. तूं तेव्हां आजारी होतीस !-'एंपायर' ला 'हॅम्लेट' होता तेव्हां ग !—संध्याकाळच्या शोला आम्ही निघालों. खूप दूर थिएटर, अन् आम्ही नवशिक्या नि एकट्या निघालेल्या. पण आम्हाला कसलीच कदर नव्हती. रात्रीं नऊ वाजतां पिक्चर सुटल्यावर आम्ही चांदण्यांतून लांबच्या रस्त्यानें मजेंत चाललों होतों. रुबी शिट्टीवर गाणं गुण-गुणत होती. कुसुमची नि माझी हात सोडून जायची बेट लागली होती.

मी दोन्ही हात सोडून वेगानें सायकल सोडली होती. पण–पण–नाहीं ग–पडलें नाहीं मी; पण बाजूच्या इराण्याच्या हॉटेलमधून तो बाहेर येतांना मला दिसला ! बंद गळ्याचा पुलओव्हर घातलेला व पाइप तोंडांत धरलेला. तो दिसतांच माझा तोल गेला. कशीबशी मी सायकल सांवरली, स्वतःला सावरलं. पाय लटपटत होते नि तोंड कडू झालं होतं. माझा विरस झाला, सारा उत्साहच उतरून गेला. तो दिसतांच मला तो मवाली आठवला, आगगाडी आठवली, सारे धोके आठवले, मला उलट त्या निर्जन, अंधेऱ्या रस्त्याची भीति वाटली. कोऱ्या सायकलची नि माझ्या कौमार्याची भीति वाटली. मी बेट हरलें. मला वाटलं, मी सारंच हरलें..."

सुषमेचा स्वर शेवटीं शेवटीं अगदीं घोगरा झाला व अखेर ती गप्प झाली. ती थांबली खरी, पण तिचं शरीर थरथरतच राहिलं.

बकुळेलाहि बावरल्यासारखं झालं. तिच्या गोड कल्पनांचा भुगा झाला होता. सारंच तिला नवं, निराळं, नकोसं वाटत होतं. तिला वाटलं, त्याच्या अस्तित्वानें आधार वाटायच्या ऐवजीं सुषमेचा धीर सुटला, हें कसं ? असं कसं घडेल ? ती हलकेच उद्गारली,

" त्यानं पाहिलं नाहीं तुला ? हंसला नाहीं तो ? "

" नाहीं, मी वेगांत होतें. पाहिलं असतं त्यानं तर मात्र पडलेंच असतें मी ! तेव्हां पाहिलं नाहीं. पण नंतर पंधराच दिवसांनीं त्यानं मला पाहिलं. "

" हो ? " बकुळा म्हणाली, " मग ओळखलं त्यानं ? " ती आतुरतेनें म्हणाली, " हंसला तो ? " तिचाहि चेहरा हंसरा झाला.

" हो !– संध्याकाळीं मी वासंतीला घेऊन चाललें होतें. तिला गोंडे हवे होते. हमरस्त्यावर आम्हीं आलों नि दुकानं पहात चालूं लागलों. इकडेतिकडे पहातांना तो एका बूटपॉलिशवाल्यापुढें उभा असलेला मला दिसला. तोच तो हें मी क्षणार्धांत हेरलं; अन त्यापेक्षांहि कमी वेळांत माझ्या मनानं ठरवलं कीं आपण त्याच्याकडे पहायचं नाहीं. माझ्या मनाचं मला विलक्षण आश्चर्य वाटलं. त्याला ओळख द्यायची नाहीं असा मी बेत केलेला नव्हता, विचार ठरवला नव्हता. मी कांहींच विचार केलेला नव्हता. पण त्याची चाहूल लागतांच माझं मन वेगानं दूर पळालं. त्याला

पाहिलंच नाहीं, अशी बतावणी करून मी गोंडे धुंडूं लागलें. मी पाहिलं नाहीं, तरी मला दुकानांतल्या लहानशा आरशांत सारं दिसत होतं. तो माझ्याच दिशेनें पहात होता. त्याचा चेहरा फुलला होता. एवढंच नाहीं. बरोबरीच्या मित्रांना तो मला दाखवीत होता, कांहींतरी सांगत होता. तें दिसतांच मात्र माझं कपाळ आंठ्यांनीं भरलं नि हृदयाला पीळ पडला. 'ती दुकानांत शिरली आहे ना, ती मुलगी ! तिला मी गुंडाच्या तावडींतून सोडवली. ह्या पोरींना एकटं भटकायला हवं ! मी होतों म्हणून अब्रू बचावली. मोठयांची मुलगी आहे, अन् गोड आहे. आतां बघ, ओळखल्यावर हंसेल–' अशीच तो मित्राजवळ मिजास मारीत असावा. त्याचं बोट दाखवणं, शिष्टपणें हंसणं, मालकी हक्कानें मान उडवणं, अन् त्या टोळक्यानें प्रदर्शनांत पहातात तशा नजरेनें मला पहाणं नि आगगाडींतली घडामोड डोक्यांत घोळवणं, ह्या सगळ्यांची मला चीड आली, घृणा आली. दुकानांतल्या कपाटांत ठेवलेल्या आरशांतून अर्धवट दिसणारं तें दृश्य मला चौफेर दिसूं लागलं. माझ्या घशाला कोरड पडली नि डोळ्यापुढें अंधार आला. वासंतीनें पसंत केलेले गोंडे मी उचलले, पैसे दिले नि बाहेर आलें. मी त्याच्याकडे पाहीन ह्याची वाट पहात तो हंसत होता. तो पुढेंहि आला असता—पण त्याचा एक बूट पॉलिश होत होता. मी सगळं जेमतेम निरखलं नि घाईनें समोरचा टांगा थांबवून त्यांत चढलें. हवे ते गोंडे नि वर टांग्याची रपेट मिळाल्यानें वासंती खूष होती. तिची लाडिक बडबड ऐकायचं ढोंग करीत मी त्याला टाळलं—अन् तो दृष्टीआड होतांच सुटकेचा सुस्कारा सोडला."

कशांतून तरी सुटल्यासारखा आविर्भाव करून सुषमेनें बोलणं बंद केलं. तळहाताचा घाम पुसला. पुढें आलेल्या केसांच्या वळणा मागें ढकलल्या. मग सहज ती पलिकडच्या टोपलींतून डोकावणारी बाहुली, बांगड्या, फुटका आरसा, मोडका घोडा, रिकाम्या डब्या नि अशाच टाकलेल्या वस्तू नि खेळणीं पहात बसली.

बकुळेला वाटलं, पण एवढं टाळायचं काय कारण त्याला ? प्रौढी मारण्यासारखं, वीरासारखं कृत्य केलंच आहे त्यानं ! तिला तर त्या

अज्ञात पुरुषाला ओवाळावसंच वाटलं. पण तेवढ्यांत तिला मैत्रिणीचा अनिवार उमाळा आला. तिची मैत्रीण काय कृत्या आहे, हतभागी आहे, फुटक्या शीलाची आहे?—कां तिच्याकडे बोट दाखवावं कुणी? प्रत्यक्ष उपकारकर्त्यानं सुद्धां कां इतका असमंजसपणा दाखवावा? जो शील सांभाळतो त्यानें शीलावरचं संकटहि लपवलं पाहिजे—तिलाही सुषमेचं बोलणं पटूं लागलं. पण पुन्हां तिच्या मनांत गोंधळ माजूं लागला. सुषमा फार विचित्र, वेडी वाटूं लागली. तिला समजावण्याकरितां ती हात पुढें करून बोलायचा प्रयत्न करूं लागली.

पण तेवढ्यांत हातांतला आल्याचा तुकडा समोर रचलेल्या फाटक्या गाद्यावर तिटकाऱ्यानें मारीत सुषमा संतापानें म्हणाली, "आणि आज तर कळस झाला! मी भाजी घेत मंडईत हिंडत होतें. न्हाऊन, नवी साडी नेसून निघालें होतें. फुलकोबीचा रस्सा, तोंडल्याचा भात, वांग्याचं भरीत असा काहींतरी बेत योजीत मी भाजी घेत होतें. संध्याकाळीं शकूच्या लग्नाला जायचें म्हणून खुषीत होते—आणि तो भर मंडईत समोर दिसला! अगदीं नेमका माझ्या नाकासमोर! मी दचकलें, भांबावलें. माझी सुटका अशक्य होती पाठीमागें भाजीवाली होती, एका बाजूला चिखल होता नि दुसऱ्या दिशेला मोकाट सुटलेले पोळ हिंडत होते. समोरच हा दत्त म्हणून उभा! मला वाटलं, त्याच्याशीं बोलावं, निदान हंसावं. पण मला— पण मला अवसानच येईना. जीभ आंत ओढली गेली, तोंड कडू झालं नि हातापायांना कापरं भरलं. तरीहि त्याला टाळणार कसं, ओलांडणार कसं? तो तर रस्ता अडवून, टक लावून, हंसत होता! त्यानें विषारी नजरेनें पाहिलं असतं तर मी संतापानें पाहून त्याला शरमिंधा केलं असतं, तो हलकटपणें हंसला असता तर त्याला हात दाखवला असता. पण तो अगदीं पहिल्यासारखा, नेहमींसारखा पहात हंसला. तीच उपकार केल्याची जाणीव दाखवणारी प्रतिष्ठित नजर. अन् तेंच कृतज्ञतेची अपेक्षा करणारं शिष्ट हास्य! तें ओंठ नि तें डोळे पाहून मला वाटलं, अरेरे, ह्या माणसानें आपल्या बळकट हातांनीं माझं रक्षण केलं खरं; पण त्याच्या ह्या ओठांनीं नि डोळ्यांनीं

मलाहि त्या मवाल्यापुढें पदर धरून कायमचं उभं करून ठेवलं ! तो मवाली माझं तोंड काळं करून मला अंधेरांत ढकलणार होता; पण ह्या मर्दानें माझें तोंड नुसतंच उजळ ठेवलं नाहीं, तर माझ्यावर आपल्या कर्तृत्वाचा कवडसा सारखा धरून ठेवून मला कायमची शरमिंदीं केली. त्या सैतानापेक्षां मला ह्या देवमाणसाची धास्ती वाटली. वाटलं, डब्यांत एकटी गांठून अत्याचार करूं पहाणाऱ्या त्या मवाल्याची मिठी पत्करली; पण अशी ओळख दाखवून भरलेल्या मंडईत हा माझी विटंबना करीत आहे, ती सहन करणं नको !...

"तो दृष्टीस पडतांच मला ती आगगाडी आठवली, जगांतल्या साऱ्या गलिच्छ गोष्टी आठवल्या, ब्रह्मांड आठवलं. असा कोंडमारा कायमचा सहन करणं अगदीं अशक्य होतं. पहातां पहातां माझं हृदय पेटून निघालं.त्याच्याकडे जितक्या तिटकाऱ्यानें, त्वेषानें पहातां येईल तितकं मी पाहिलं. अन् मग एकदम पाठ फिरवली. मंडईतली ती गर्दी-गोंधळ मला भेडसावूं लागलीं. स्वतःला सांवरीत मी धांवत सुटलें. तुझ्या घरांत शिरूनहि शांत वाटेना. होमगार्डला चाललेला तुझा भाऊ पाहून मला तुझ्याशीं धड बोलतां येईना. म्हणून म्हटलं, माळ्यावर चल. सगळं जग मला डोकं फिरलेली, उलट्या काळजाची म्हणेल. पण तूं तरी माझं ऐक, मला समजून घे—"

बोलतां बोलतां सुषमा चौधरी थांबली. तिच्या हृदयांत घालमेल होत होती. शरीर थरथरत होतं नि नजर भिरभिरत होती. बकुळेला आपलं म्हणणं कळलं कीं नाहीं ह्याचा विचार करायचाहि ती आतां विसरली होती. आपलं वागणं योग्य असल्याचं तिचं तिलाच पटलं आणि आपलं हृदय हलकं झाल्याचं समाधान लाभलं. वरच्या कौलारांतून उतरलेल्या सूर्यकिरणाच्या कवडशाकडे ती टक लावून पहात राहिली.

★ ★ ★

# आरामखुर्ची

मुंबईच्या कफ परेडवर रहाणाऱ्या मिसेस् चॅटरवुड्च्या बिऱ्हाडांत ती आरामखुर्ची अनेक वर्षे होती. ऐसपैस रेलून बसायच्या खुर्च्यांसारखी, पाठ व बैठक वेतानें विणलेली, हातपायांना नाजुक नक्षी व तुळतुळीत पॉलिश केलली. दिवाणखान्यांत शेकोटीच्या जागेजवळ ती ठेवलेली असे, व तींत बसून समोरच्या समुद्राची शोभा पहातां येत असे. शेजारीं ठेवलेल्या तिपाई-वर नेहमीं दोनचार कादंबऱ्या ठेवलेल्या असत. उजवा हात जरा लांब केला कीं, बाजूचा रेडिओ कळ फिरवून सुरू करतां येत असे. शेकोटीवरच्या फळीवर सुबकसें घड्याळ टिकटिकत राही. वर भिंतीला इंग्लंडमधल्या खेड्यांत पडणाऱ्या बर्फाची शोभा दाखवणारें चित्र टांगलें होतें. त्या बंगलीं-तल्या अनेक ऐसपैस खोल्यापेक्षां ह्या दिवाणखान्यांत, त्यांतहि दिवाणखा-न्यांतल्या इतर खुर्च्याकोचांपेक्षा ह्या आरामखुर्चीवर रेलून बसण्यांत स्वर्गसुख होतें. असें सुख मिसेस् चॅटरवुड् अगर तिचे यजमान अगर त्यांच्याकडची आया अनेकवार, अनेक साल, उपभोगीत होती.

हिंदुस्थान हातचा दवडल्यानंतर चॅटरवुड् दांपत्य मायदेशीं परतलें. जड व जुनाट सामानाचा त्यांनीं लिलांव केला. त्यांत ती आरामखुर्ची ताड-देवच्या होरमस्जी बॅंकरनें घेतली. पाठीचा तुटलेला वेत पुन्हा बांधायला म्हणून ती केव्हांतरी भायखळयाच्या हुसेन मोपला कंपनीकडे आली. तेथून ती बेपत्ता होऊन चोरबाजारांत विक्रीला आली. गुरुमुखसिंग नांवाच्या फर्निचरविक्र्या शिखानें ती उचलून आणली व पॉलिशचा व वेताचा हात फिरवून आपल्या परळच्या दुकानांत ठेवली. आणि वर्ष दीडवर्षांनीं तेथल्या खुर्च्याकपाटांच्या दाटींतून बाबूराव तांबेकरांनीं ऑफिसांतल्या अनेक मित्रांच्या साहाय्यानें सौदा करून ती खुर्ची मुरकत मिरवत चंद्रमहाल चाळींतल्या चवथ्या मजल्यावरील आपल्या बिऱ्हाडांत आणली. दोन खोल्यांच्या त्या गाळयांत आंतली खोली स्वैंपाकाची व बाहेरची बसायची होती. बाहेरच्या त्या दीड खण खोलींतल्या एकुलत्या एक खिडकीशीं ती खुर्ची ठेवली गेली. तेथें पूर्वी असलेली गाद्यांची उतरंड दाराजवळच्या जोडेवहाणांच्या जवळच्या

भिंतीशीं ओठंगून ठेवली गेली. दुसरी जागाच नव्हती. औषधाकपड्यांचें कपाट, ट्रंकांची चळथ, कपड्यांचे बोळे, केरसुणी, पाट, गाद्या दाराशीं जाणेंच भाग होतें. आणि खिडकीपासची जागाच खुर्चीला खुलून दिसत होती. तिथेंच ती कौतुकाची खुर्ची कायमची खिळून राहिली....

पहाटें दूधवाल्या भय्यानें दार खडखडवलें, तेव्हां आरामखुर्चीत वेटोळे करून निजलेल्या मांजरानें डोळे उघडले, पाठीची कमान केली व खुर्ची-खालीं उडी घेतली. रात्रभर खुर्चीत छान झोंप आली होती. पायाच्या नख्या वेतांच्या फटींत फिरवतां येत होत्या, व डोळे किलकिलें करून जमि-नीवर पसरलेल्या माणसाकडे व त्यांच्यामधून वावरणाऱ्या ढेकणांकडें पहातां येत होतें. मांजरानें उडी मारायच्या आधींच आजोबा उठले व त्यांनीं अंधारांतच दार उघडून दूध घेतलें. आंतल्या स्वैंपाकाच्या खोलींत सून व मुलगा झोंपला असल्यानें दुधाचें भांडे आंत नेऊन ठेवणें शक्य नव्हतें. आजोबांना आतां झोंप येत नव्हती. नळ अजून यायचे होते, उजेड अजून व्हायचा होता. सर्वजण निजले असतांना अंधारांत एकटें बसून काय करा-यचें ? खोलींतल्या जाजमावर जेमतेम दोन गाद्या मावत होत्या; आणि त्यांवर नानूकाका, मधू, वेणू व गंगूआत्या झोंपलीं होतीं. नानूकाका कपा-टाच्या फटींत घुसला होता. मधूचें पाय वेणूच्या मानेवर पडले होतें. गंगू-आत्याचें केंस नसलेलें डोकें वारंवार भिंतीला लागत होतें व फताकडे पाय पाटांच्या व ट्रंकांच्या कोपऱ्यांना घासटत होते. आजोबांची जोडेवहाणा-जवळची जागा रिकामी झाली होती–तिथें आपण आठ तास कसें निजलों, आज आठ वर्षें कसें निजतों ह्याचें आजोबांना आश्चर्य वाटलें. त्या एव-ढ्याशा खोलींत कोंडलेलीं माणसं नि सामान त्याना गुदमरून टाकूं लागलं. आणि ओढ लागून ते आरामखुर्चीकडें धांवलें.

खुर्चींत बसल्यावर आजोबांना बरें वाटलें, मोकळेंमोकळें वाटलें. मोड-लेली मान, अवघडलेले पाय आतां ऐसपैस ठेवतां येत होते. इतर माणसा-पासून दुरावलेलें, उंचावलेलें शरीर खिडकींतून आलेल्या वाऱ्याच्या झुळकीनें सुखावलें आणि—आणि रोजच्याप्रमाणें आजहि त्यांना आपल्या गांवाची, घराची आठवण झाली. जणूं सोप्यावरच्या झोपाळ्यावरच ते बसले होते. तो

झोपाळा असाच छोटा होता. लहानपणीं ते त्यावर बागडत, तरुणपणीं शेता-वरून परतले कीं, विसांवत; पोक्तपणीं मुलाला खेळवत तेथें टेकत. खुर्चीचे हात म्हणजे त्यांना झोपाळ्याच्या कड्या वाटूं लागल्या; आणि पुढ्यांतलें दुधाचें भांडें...आजोबांना खेड्यांतली पहांट स्मरली. दुधाची चरवी घेऊन ते गोठ्यांत धार काढीत होते. धारेचा भांड्यांत होणारा किणकिणाट, आंबोणाचा वैरणीचा वास, निरसं शुभ्र, फेंसाळ दूध !...हळुंहळूं त्यांच्या मिटलेल्या डोळ्यापुढें अंगणांत ओढलेल्या रांगोळीच्या रेघा फिरल्या, प्राज-क्ताच्या फुलांचा सडा पसरूं लागला, नदीच्या पाण्याचा प्रचंड ओघ धावूं लागला...

दूरवरच्या मोऱ्यांतील नळांचीं बोळकीं वाजलीं, कुठूनसे तंबाखूचे वास आले, आणि आजोबा ओशाळून भानावर आले. ती खुर्ची व ती खोली पहातांच त्यांना ब्रम्हांड आठवलें. हातांतल्या पांढऱ्या पाण्याचें छोटें भांडें त्यांनीं नीट धरलें नि अंधारांत हांक मारली,

'सूनबाई--'

स्वैंपाक करावयाच्या गाळ्यांत झोंपलेली सरस्वती मधलें दार उघडून आली. अर्धवट झोंप झाल्यानें तिचें कपाळ आठ्यांनीं नि जटांनीं भरलें होतें. आजोबांना आरामखुर्चीत पाहून ती अधिकच भडकली. त्या सुंदर नाजूक खुर्चीवर बसून मामंजी ती मोडून टाकतात या भावनेनें ती बेजार होती. पण तसें पाहिलें तर सारेंच दिवसभर धुडगूस घालून त्या खुर्चीचें खेळणें करून सोडीत होते. तिचा संसार, पण तिला बोलायबसायची चोरी. त्या खुर्चीवर बसायचीहि चोरी ! सरस्वतीचें तोंड कडूकडू झालें. आजोबांनीं उठून तिच्या हातीं दिलेलें दूध घेऊन ती घरांत गेली.

आजोबांना पुन्हा गुदमरल्यागत् वाटूं लागलें. खुर्चीतून ते उठले होते. एक पाय उशीवर व एक पाय नानूकाकाच्या नि मधूच्या मध्यें ठेवून ते कसेबसे उभे होते. आतां त्यांना खुर्चीकडे परतायचीहि भीति वाटूं लागली. दिवसाचा रगाडा सुरू झाला कीं, खुर्चीत बसायला सवड कुठली मिळ-णार ?—ते खिन्नपणें खोलीभर पाहूं लागले.

तेवढ्यांत पायथ्याशींच पसरलेला, नुकताच इंग्रजी शाळेंत गेलेला मधू पटकन उठला व खुर्चींत घुसला. तो बराच वेळ जागा होता व आपण खुर्चीतून खालीं कसे आलों ह्याचा विचार करीत होता. एवढ्या गर्दीत, अर्ध्यामुर्ध्या गादींत, गुदमरण्यापेक्षां आरामखुर्चीत अंग झोकून दिलें तर काय बिघडतें हें त्याला कळत नव्हतें. तो खुर्चीतच खालीं सरकला व तंगड्या खुर्चीच्या हातांवर टाकून पडला. आतां अगदीं पलंगावर असल्यासारखें वाटत होतें. त्याच्या कित्येक दोस्तांना स्वतंत्र, छोटे पलंग होते. एक दोघांना झोंपायच्या वेगळ्या खोल्याहि होत्या. ह्याला मात्र खुर्चीत झोंपतों असं म्हणायचीहि सोय नव्हती. माणसांच्या दाटींत, गाद्यांच्या फटींत झोंपावं लागे. वेणूचा शेपटा नाकांत जाई, काकाच्या लाथा बसत, अन् आजोबा अपरात्री ठसकूं लागले कीं...

बाबूराव धोतराचा सोगा खांद्यावर टाकीत शय्यागृह बनवलेल्या स्वैपाकघरांतून बाहेर आले. खुर्चीवर पेंगणाऱ्या पोरट्याला पहातांच ते खेकसले, "ऊठ गद्ध्या ! तोंड नाहीं कां धुवायचं ? लोळतोस आहेस तो डुकरासारखा—"

मग झोंपलेले सारेच उठले. पासोड्यांच्या घड्या घातल्या गेल्या, गाद्यांच्या गुंडाळ्या झाल्या, सर्व चिरगुटं दाराजवळ रचलीं गेलीं. आंतल्या मोरींत ठेवलेले पाट परत भिंतीशीं उभे केले गेले. काढून ठेवलेला दोऱ्यांचा झोळ परत बाळाला झोंपायला बांधून ठेवला. अखेर खोलीच्या मध्यभागीं जराशी जागा रिकामी झाली.

बाबूराव ही आंवराआंवर आरामखुर्चीत पडून पहात होते.

स्वैंपाकघरांत चहा पिण्याचा घोळ सुरू झाला. सरस्वती चहाचा कप घेऊन बाहेर नवऱ्याकडे आली. नवऱ्याशीं बोलायला सबंध दिवसांत तिला एवढाच एकांत मिळत असे. आरामखुर्चीत आळसावून बसलेल्या बाबूरावांना बशींत चहा ओतून देत ती म्हणाली, "घ्या ! अन् आंघोळ करणार ना ?"

आंघोळीची आठवण करून देतांच बाबूरावांच्या कपाळावर आंठ्या उमटल्या. उंदराच्या बिळाएवढ्या मोरींत बसून कोमट पाण्याचे कावळ्यासारखे चार शिंतोडे अंगावर उडवायचे ! त्यापेक्षां ह्या खुर्चीत बसलें तर वाऱ्याची

जराशी झुळूक तरी येत असे. त्रासून ते म्हणाले, " हो ग ! जरा बसलों आहें मजेंत तर—"

" तसं नाहीं. मग ऑफिसला उशीर होतो ना—"

" ऑफिस नेहमींचं आहेच ! कधीं स्वस्थपणें बसायलाहि मिळत नाहीं. ही खुर्ची केवढ्या कौतुकानें आणली. सहा महिन्यांची शिल्लक खर्चून चैनीची चीज आणली; पण गेल्या वर्षांत कधीं घटकाभर—"

सरस्वतीला नवऱ्याचें म्हणणें पटलें. डाल्डाच्या डब्याऐवजीं, लुगड्यांच्या जोडीऐवजीं ती खुर्ची घरांत आली होती. पण बिचाऱ्या बाबूरावांना तिचं सुख नव्हतं !—अन् तिलाहि. चहाचा कप घेतांना ती खुर्चीच्या हातावर टेकली, बाबूरावांच्या हातांवर रेलली.

तेवढ्यांत खिडकीपासच्या व्हरांड्यांतून आजूबाजूचे बिऱ्हाडकरू उलट-सुलट जातांना दिसले, आणि आंतल्या खोलींतून चहा संपवून एकएक-जण बाहेरच्या खोलींत टपकूं लागले.

रिकामी कपबशी घेऊन सरस्वती फणकाऱ्यानें आंत घरांत गेली. आजो-बांनीं आंतून बाळाला आणून बाहेर टांगलेल्या झोळांत ठेवलें व ते झोके देत उभे राहिले. नानूकाका कपाटाशीं कांहींतरी करीत उभा होता. गाद्यांच्या ढिगांवर पुस्तकं पसरून मधू उभ्यानें अभ्यास करूं लागला. आंतून रंगुआत्या फणीकरंड्याचं घेऊन आली व खोलीच्या मध्यभागीं फत-कल मारून बसली, वेणूची वेणी घालूं लागली.

संसाराचें हें स्वरूप पाहून बाबूरावांचें मन मरगळून गेलें. कचेरींत दाटीनें मांडलेलीं टेबलें, वाजणारे टाइपरायटर, फायलींच्या कागदांचा गोंधळ, हॉटेलांत गिऱ्हाइकांची गर्दी, कपबशांचा खणखणाट, चहासोड्याच्या ऑर्डरी ...अन् तेंच, तसेंच घरीं ! बाबूरावांना अगदीं क्षीणपणें का होईना, पण वाटलें कीं केरसुणी घेऊन सारीं सामानाचीं व माणसांचीं जळमटं झटकून टाकावीं, अन् मग चांगले आळोखेपिळोखे देत खोलीभर....

पण खुर्चीवरून जरा हालणेंसुद्धां शक्य नव्हतें, इष्ट नव्हतें. खुर्चीतून दूर झालं कीं, तिथें कुणीं दुसरं बसणार ! अन् आपल्याला अडगळींत ठेचाळत,

चक्रव्यूहांत घोटाळत, घामाच्या धारा पुसत बसावं लागणार! बसूनच बाबूराव म्हणाले, "मधू, तो खुंटीवरचा शर्ट दे रे जरा—"

मधूनें चेहरा वांकडा केला. अंगांतून आग निघते आहे तरी बाबूरावांना शर्ट घालावासा वाटत होता. खुर्चीत, खिडकीशीं होतें ना ते!–वारा येत असेल. अन् उजेडसुद्धां. मधूला मात्र उभं राहून अपुऱ्या उजेडात गाद्यांवर पुस्तकं मांडून कसाबसा अभ्यास करावा लागत होता.

खुंटीवरचा सदरा उडी मारून काढतांना मधूच्या मनांत युक्ति चमकली. बाबूरावांच्याकडें सदरा करीत त्यानें दाराकडें पाहिलें व म्हटलें, "कुणी हांक मारतंय् तुम्हांला बाबूराव! खालीं—रस्त्यावर—" आणि कंटाळलेले बाबूराव अभावितपणें उठले. खुर्ची टाकून व्हरांड्याकडे गेले आणि आपला आनंद आंवरीत मधोबा मोठ्या मानानें खुर्चीत विराजमान झाले.

कपाटाशीं केवढा वेळचा उभा असलेला नानूकाका खुनशीपणानें खुर्चीकडे आला. मधूच्या दंडाला धरून ओरडला, "ऊठ, ऊठ आधीं! मला बसायचं आहे. तुला, तूं—"

काकाला कांहीं कारण देतां आलें नाहीं. तो अधिकच चिडला. सकाळपासून तो उंबरठ्याशीं, व्हरांड्यांत, कपाटाशीं कसाबसा उभा होता. नोकरी न करतां घरीं बसतो म्हणून त्याचा तिटकारा होत असे. पण घरीं बसायला काय, उभें राह्यलाहि जागा नव्हती. मधूला गचांडी मारून तो स्वतःच खुर्चीत धाडकन् बसला.

मधूनें भोकांड पसरलें. खुर्चीला, कपाटाला, भिंतीला, तो लाथा मारू लागला. आणि माणसांनाहि. रोज रात्रीं बाबूराव त्याला खुर्चीतून उठण्याचा हुकूम करीत व स्वतः तिच्यांत तपकीर ओढीत बसत. दम्याच्या नांवाखालीं आजोबा त्याला असेंच हुसकावून खुर्चीत बसत. काका तर कळसच करी!...मधू मुसमुसूं लागला. बाबूरावांचें व आजोबांचें लक्ष ओढून घ्यायचा यत्न करूं लागला. व्हरांड्यांतून बाबूराव खालीं रस्त्यावर बोलत होते. त्यांनींच एका ओळखीच्या इसमाला हटकलें होतें. मात्र त्याला घरांत बोलावण्याचा त्यांना धीर होत नव्हता. घरांत बसणार कुठें तो इसम? —अन् तो आला कीं इतरांना किती अडचण पडणार? व्हरांड्यांत वेळ

काढीत बाबूराव उभे होते व झोल्यांत जाग्या झालेल्या बाळाशीं बडबडत आजोबा आजूबाजूची गडबड विसरून पहात होते.

पण वेणूला अचानक आपल्या भावाचा पुळका आला. कालच सकाळीं खुर्चीवर बसल्याबद्दल तिला मधूनें वोचकारलें होतें; पण काका तिथें बसून समोरच्या चाळींतल्या मुलींकडे बघतो ह्या संशयानें तिला पछाडलें होतें. खेरीज वेणी घातल्यानंतर रिबन बांधायची, तीं खुर्चीवर बसून गुणगुणत गुंफायची, असे तिचें लाडकें स्वप्न होतें. शेपटा झटकारीत ती एकदम म्हणाली, " मला खोली झाडायची आहे. सब लोग बाहर निकलो ! "

तिचें बोलणें ऐकूं आलें नाहीं असें सर्वांनीं दर्शविलें. पण पदर खोंचून तिनें केरसुणी हातांत घेतांच एकएकजण जागें झालें. मधू मुकाट्यानें बाहेर गेला, आजोबा मधूच्या मागोमाग गेले.बाहेरून येणारे बाबूराव तसेच परतले. सर्वांत शेवटीं तडफडत चरफडत काका खुर्चीतून उठून व्हरांड्यांत गेला.

वेणू खुदकन् हंसली. रिकाम्या खोलींत तिनें गिरकी घेतली. रिकाम्या खुर्चीकडे तिनें वेड लागून पाहिलें. मॉटेसरीचें व हिंदी क्लासचें सार्थक झालें अखेर ! त्या टीचभर खोलीचा तिनें तासभर केर काढला. केरसुणी कोपऱ्यांत ठेवून पदर मोकळा करीत ती खुर्चीत बसली.

व्हरांड्यांतल्या मंडळींना चुटपुट होतीच. केर काढून झाल्याचें सर्वांनीं हेरलें. सगळे एकदम आंत आले व खुर्चीकडे धांवले. मधू,नानूकाका,बाबूराव, आजोबा...

तेवढ्यांत आंतून लुगड्याचा बोळा बाहेरच्या खोलींत घेऊन येत रंगूआत्या म्हणाली, " थांबा, मी लुगडं बदलत्यें आहें—"

आंत आलेले पुरुष आंबट चेहरे करून परत व्हरांड्यांच्या कठड्याशीं खडे झाले. मधूहि अभावितपणें बाहेर गेला. खुर्चीत बसलेली वेणू गाणें गुणगुणूं लागली.

लुगडें नेसून झाल्यावर रंगूआत्या म्हणाली , " बाहेर नका उभे राहूं ! आंघोळी आटोपून घ्या लौकर ! नऊ वाजायला आले—"

मधू आंत आला व मोरीकडे धांवला. आंघोळीकरतां आधीं आपलाच बळी देणार हें तो ओळखून होता. पुरुष मंडळी आली तरी वेणू खुर्चीत

बसूनच होती. किती दिवसांनीं ती खुर्चींत बसली होती. स्वैंपाकघरांत शेगडीशीं व बाहेरच्या खोलींत कपाटाच्या कडेला नेहमीं नेहमीं बसून ती कंटाळली होती. आतां कसं आरामांत—

तेवढ्यांत काका तिच्या रोखानें आला. ती भेदरून उठली व आंत पळाली. तें पहातांच काकाहि वरमला. त्यानें पाहिलें तो उंबरठ्यावरून आजोबा त्वेषानें त्याच्याकडें पहात होते; आणि बाबूराव आपलें लक्ष नाहीं असें दर्शवीत दारांतून बाहेर पहात होते. काकाला त्या दोघांच्या दृष्टीचें भारी भय वाटलें. बावरून तो तसाच खुर्चीच्या पुढ्यांत उभा राहिला.

—मग कांहीं काळ ते पुरुष त्या खोलींत तसेंच अवघडून वेड्यासारखे उभे होते!

झोल्यांत बाळ अचानक रडूं लागला. त्याच्या आरड्यानें सगळे हादरले. त्याला गप्प करायला जो तो धडपडूं लागला. झोल्यांतून काढून त्याला अखेर खुर्चीवर बसवण्यांत आलें. हवेची झुळूक येतांच त्याचें रडें थांबूं लागलें. उन्हाचा कवडसा दिसतांच त्याच्या मुखावर हास्य उमटलें. बाळा-भोंवतीं, खुर्चीभोंवतीं कोंडाळं करून सारेजण बसले. आजोबा टिचक्या वाजवूं लागले, मधू तोंड करूं लागला, वेणूनें रिबन पुढें केली, नानूकाका......

शेगडीशीं शिजत असलेली सरस्वती संतापून बाहेर आली. बाळाला उचलून घेत म्हणाली, "माझ्याजवळ नाहीं का द्यायचा?—" वेणूवर ओरडली, "पाटपाणी कर। म्हटलं." मधूला म्हणाली, "शाळा नाही कां?" कोंडोळें पांगतांच ती खुर्चीत बाळाला पाजीत बसली. शांतपणें खुर्चींत बसल्यानें तिला बरें वाटलें. हें समाधान बाळ छातीशीं आहे म्हणून मिळतें आहे, कीं खुर्ची पाठीशीं आहे म्हणून मिळतें आहे, हें मात्र तिला कळेना!

पण बाळाचें पिणें झालें तरी बाकीच्यांचीं जेवणें व्हायचीं होतीं. निज-लेल्या बाळाला झोल्यांत टाकून ती घाईनें घरांत गेली. बाळाला अजून पांच वेळां पाजलें पाहिजे, पण आपल्याला पुन्हां एकदां तरी खुर्चींत

टेकायला मिळेल कीं नाहीं, ह्या व्यथेनें ती त्रासून गेली. स्वैंपाकघराच्या दाटींत जेवायची पंगत भरली. आणि तोंवर गतधवा रंगूआत्या खुर्चींत येऊन बसली. मखरांत बसल्यासारखें वाटत होतें तिला! खोलींतल्या खुर्चींवर बसली होती ती; अन् सगळ्या खोलींत ती एकटी होती. कशाचा धक्का लागत नव्हता, कुणाचा पाय लागत नव्हता. रंगूआत्या खुर्चींतल्या खुर्चींत डाव्या अंगाला कलली, उजव्या अंगाला कलली, मागें टेकली, पुढें पाय पसरून बसली. घाम येत नव्हता, गुदमरल्यासारखें वाटत नव्हतें. खुर्चींत बसणें केवढें सुखसोहळ्याचें होतें!

चार घांस घाईनें खाऊन मधू बाहेर आला व म्हणाला, "आत्या, जेवणं झालीं आमचीं-" मधूची अधीरता आत्यानें अंशतः ओळखली. चिडून ती म्हणाली, "मेल्या, आंचवलास कां तरी नीट?" पण इतरांचे आंचवण्याचे आवाज ऐकू येतांच तिला उठावें लागलें. मधू तिच्याकडें पाहून, न राहवून हंसला. इंग्रजी बोलत, दप्तर घेऊन खुर्चींत बसला. मग एकदम उठला! सगळं जग आपल्याला डाग देत आहेसें त्याला वाटलें. कुणी खोलींत यायच्या आंत त्यानें शाळेकडे धूम ठोकली.

बाबूराव हात पुशीत बाहेर आले व सुपारी खात खुर्चींवर टेकले. रोजच्या प्रमाणें आजहि रजा घ्यावी असा विचार त्यांच्या मनांत आला. पण रविवारच्या सुट्टीच्या दिवशीं घरीं काय हाल होतात हें त्यांना आठवलें. उकाड्यानें जीव नकोसा होतो. एवढ्याशा जागेत ढीगभर माणसें तडफडत असतात. मित्रांना घरीं बोलावून पत्ते खेळायची सोय नसते. बायकोशीं बोलायचीहि सोय नसते. खुर्चींवर जरा वाचीत पडलों कीं आपलींच माणसें खुनशीपणें आपल्याकडे पहात रहातात. बाबूराव उठले. त्यांच्या मनांतलें स्वतंत्र घर, त्यांतला दिवाणखाना, त्यांत ठेवलेला सोफासेट—सारें छिन्नविच्छिन्न झालें. आजूबाजूच्या अडगळीकडें त्रासलेल्या नजरेनें, तिऱ्हाईताच्या मुद्रेनें पहात ते कचेरीकडें निघाले.

आजोबा आंतून आले व खुर्चींत मख्खपणें बसून राहिले. बाबू बाहेर जाण्याची ते वाटच पहात होते. खुर्चींवर बसण्यावरून लेकाशीं आपलें

भांडण होईल ह्याचें त्यांना भय वाटे. आणि धाकटा लेक उद्योग न करतां खुर्चीत बसून मजा मारतो ह्याचीहि त्यांना चीड येई. जेवणानंतर जरा विश्रांतीची त्यांना जरूर असे. वेणू तीनतीनदां विचारी, 'आजोबा, उशी देऊं कां ?-' तरी ते ऐकत नसत. व्हरांड्यांत विनाकारण उभ्या असलेल्या नानूला तीनतीनदां बोलावीत व म्हणत, "घरीं काय माशा मारतोस ? बाहेर खटपट कर कुठें—"

वेणूनें आंतल्या बाहेरच्या खोलींत उगाचच इकडे तिकडे केलें व ती क्लासला निघाली. भव्य इमारती, प्रशस्त व्हरांडे व खोल्या, मोठाले जिने व स्वतंत्र मोऱ्या–नवीन भाषा शिकायला व निरनिराळ्या मैत्रिणींत मिसळायला ती आतुर झाली. तिच्या मागोमाग कंटाळलेला, कावलेला काकाहि निघाला. व्हरांड्यांत उभें रहाणें अप्रशस्त दिसत होतें; खोलींतल्या अडगळींत सामावून जाणें अशक्य होतें. त्यापेक्षां चौपाटीच्या बांकड्यावर अगर इराण्याच्या उपाहारगृहांत वेळ काढणें हजारपटीनें सुखाचें होतें. घरांतल्या लोकांना घाणेरड्या शिव्या देत तो अदृश्य झाला.

मुलें गेल्यावर आजोबांना जरा बरें वाटलें. खुर्चीत ते अधिकच रेलले. पण मग त्यांना खुर्चीचा वेत व हात खुपूं लागला. आपला संसार विस्तारला, पण वैभव आक्रसलें हें त्यांना जाणवूं लागलें. चारचौकी वाडा, आरशाचीं कपाट, सामानांच्या लोखंडी पेट्या, तक्क्यालोड, झुंबरें, झोंपाळा सारें जाऊन हे टीडखणी खबदाड, मोडकें कपाट, किरकोळ ट्रंका नि नाजूक खुर्ची नशिबांत आली ह्याचा त्यांना विलक्षण विषाद वाटूं लागला. आपल्याच मुलामाणसांचा आपण द्वेष करतों ह्या जाणिवेनें ते कावेरबावरे झाले. शेजारच्या ज्योतिषि गृहस्थाकडे गप्पा मारायला म्हणून नेहमींप्रमाणें गेले.

स्वैंपाकघरांतलें काम झरझर आटोपून रंगुआत्या व सरस्वती बाहेर आल्या. दोघींनाहि खुर्चीवर विसांवा घ्यायची विलक्षण आतुरता होती. पण दोघींहि एकमेकींना भीत होत्या. रंगूआत्या म्हणाली, "वहिनी, अन्नावर झांकण घातलं नाहीं वाटतं. बघ जरा.—" पण सरस्वती सारं हेरून होती. उंबरठ्यावर विणकाम घेऊन बसत ती म्हणाली, "आहे

झांकण. मींच घातलंय्.—" रंगूआत्याला खुर्चीकडें एकदम जायचा धीर होत नव्हता. कपाटावरचें कागद खेळवत ती उगाच उभी होती. आणि त्यामुळें सरस्वतीलाहि उंबरठा ओलांडून खुर्चीकडें जायचा धीर होत नव्हता. मध्येंच रंगूआत्या जरा हालली असें दिसतांच ती ताडकन् उठली. रंगूआत्याहि दचकली व झोल्याजवळ थबकली. झोके देत राहिली. सरस्वती बरमून बाहेरच्या दाराच्या उंबरठ्याजवळ उभी राहिली. तशा स्थितींत दोघींनाहि अवघडल्यागत झालें. "समोरच्या चाळींत काय चाललं आहे ग !–" रंगूआत्या म्हणाली व खिडकीजवळ आली. सरस्वतीच्या छातींत धडपडलें. ही अवदसा अखेर खुर्चींत बसणार तर !—अन आपल्याला जमिनीवर लोळत उकाडा सहन करावा लागणार ! अवसान आणून तीहि खिडकीशी गेली. "कुठ काय वन्सं ?–कांहींतर नाहीं...अन् व्हरांड्यांतून हीं शेजारचीं मुलं डोकावायला लागणार आतां !" ती म्हणाली व खिडकीच लावूं लागली. तिच्या हलकटपणाचा रंगूआत्याला राग आला. सारी सकाळ शेगडीशीं काढून तिचें अंग उबून गेलें होते. ह्या चाळींत चोळी काढून बसायचीहि सोय नव्हती. संतापानें रंगूआत्या दूर झाली. पण कुठें उभें रहावें, काय करावें, कळेना तिला. तशीच ती जमिनीवर आडवी झाली. माघार घेतलेली व मूक राहिलेली रंगूवन्स आपण खुर्चीवर बसलो तर खायला उठेल, हें सरस्वती ओळखून होती. 'खिडकीशीं बसायला ही कोणी कुलटा आहे का '—असें ती मागें एकदां पुटपुटल्याचें सरस्वतीला स्मरलें, व ती विलक्षण उद्विग्न झाली. ती खिडकीपासून दूर झाली, पण आंत–घरांत तिला जाववेना. रोज रात्रीं स्वैंपाकघरांत झोंपून ती त्रासली होती. अन्नाचे वास व हवेचा अभाव. तीहि रंगूआत्याजवळ जमिनीवर आडवी झाली.

खबदाडांतल्या त्या गिचमिडाटांत नंणदाभावजया रानमांजरांसारख्या एकमेकींकडे चिडून पहात, एकमेकींना टाळत, पडल्या होत्या. आजूबाजूचें सामान पायांना लागत होतें व अंगांतून घाम निघत होता. अखेर एकमेकींना मनांत शिव्या मोजत दोघीहि दमून पेंगुळल्या. सरस्वतीला वाटलें, घरांतलीं भांडीं, कपडे, कपाट, पटई आपल्या अंगावर पडत आहे, आणि

खुर्चीचा वेत काढून रंगूवन्स आपल्याला बांधीत आहे, मारीत आहे. रंगूआत्यालाहि केव्हांतरी झोंप लागली. झोंपेतच ती मेली. तिचें प्रेत खुर्चीत ठेवलें गेलें व खुर्चींतूनच ती स्वर्गांत मिरवत गेली....

बाहेर गेलेलें मांजर अंमळशानें घरांत घुसलें. दोन्ही बायांचें झोंपेंत घोरणें व पुटपुटणें ऐकून थबकलें. पाठीला बांक काढून रिकाम्या खुर्चीकडें पहात राहिलें.

★ ★ ★

# संध्या

शाळेची शेवटची घंटा होतांच बैठकीच्या खोलींत एक एक शिक्षक येऊं लागले. कुणी घाम पुसत आले, कुणी आंत येऊन तोंड पुसूं लागले. खडूच्या कांड्या, वेताच्या छड्या, हजेरीचे तक्ते कपाटांत गेले. गणिताच्या मास्तरांनीं मोठाले लाकडी कंपास कांखोटीला मारून आणले व भूगोलाच्या मास्तरांनीं पृथ्वीचे गोल तोलत आणले; जाग्यांवर ठेवून दिले. सुपारीचे तोबरें भरूं लागले, तंबाखूचें धुर सुटूं लागले. मग छत्र्या उचलीत, पाय उचलीत, एक एकजण बाहेर पडूं लागले; घराकडें जाऊं लागले.

रेगे सर नुकतेच शाळेंत आले होते व शिक्षकांच्या खोलींत बसून कसलंसं मासिक चाळीत होते. घंटा ऐकूं येतांच कामावर निघण्याच्या गडबडीने ते उठले. हातांतलें मासिक फेकून देऊन कपाटाशीं गेले. पृथ्वीच्या गोल ठेवायच्या खोड्यावर त्यांनीं फूटबॉल ठेवून दिला होता तो घेतला व खडूच्या पेटीजवळ टाकलेली शिट्टी उचलली. खोलींत येणाऱ्या शिक्षकांना जमेतम अभिवादन करीत ते निघाले. जिन्याजवळ त्यांना थाबावें लागलें. मास्तरणींचा घोळका गोंगाट करीत येत होता. त्या अरबूज व उथळ बाया पाहातांच रेग्यांच्या कपाळावर अस्पष्ट आंठी उमटली. मुलींचे खेळ घेण्यासाठीं एखाद्या शिक्षकीणीची मदत देतो—असं परवां हेडमास्तर म्हणाले होते त्याची आठवण येऊन ते अधिकच उन्मळून गेले. तोंडापुढें फुटबॉल धरून ते तसेंच त्या स्त्रियांच्या समोरून घाईने खालीं गेले. शाळेची इमारत ओलांडून मागल्या मोकळ्या मैदानावर आले. भटकणाऱ्या मुलांना इषारा देण्यासाठीं त्यांनीं शिट्टी फुंकली.

थोड्याच वेळांत खेळ सुरू झाले. रेगे सरांनीं पांचवींतल्या निवडक मुलांचे दोन संघ पाहून त्यांना फुटबॉलचा खेळ सुरू करून दिला. उरलेल्या मुलांचा हुतुतू सुरू झाला. चवथींतल्या निवडलेल्या मुलाचे बास्केटबॉल व उरलेल्यांसाठीं लगोऱ्या. आज दोनच यत्ता होत्या. पण मैदान भरून गेलें होतें. अन् मुली राहिल्याच होत्या. रेग्यांनीं मुलींना एका कडेला खोखोचा

खेळ मांडून दिला. मग ते मुलांच्यांत फुटबॉल खेळूं लागले. मध्येंच लगोऱ्यांत लक्ष घालूं लागले. बास्केट बॉल बरोबर चालला आहे कीं नाहीं तेंहीं पाहावं लागत होतं. अन् खोखोत भांडणं वाढूं लागलीं कीं तिकडे वाद मिटवायला जावं लागेच......

खोखो, हुतुतू, चेंडूचे झेल, गोल, फाऊल, धापा, धुरळा, शिट्टयांचें आवाज, मुलांच्या ओरडयांचे आवाज. मैदानभर दंगल उडून गेलेली होती व रेगे रंगून गेले होते. ग्रॅज्युएट होऊनही त्यांनीं गेमटीचरची नौकरी धरली होती. आणि इतर शिक्षकांसारखें स्त्रीच्या व संसाराच्या खोडयांत न अडकतां एकटं राहून आरामशीर आयुष्य घालवीत होते. संध्याकाळीं मुलांच्या मेळाव्यांत, फूटबॉलचा चेंडू अंतराळांत अति उंच उडवणं म्हणजे तर सुखाची परमावधि होती ! रेग्यांनीं फूटबॉल फिरवीत फिरवीत एकदम किक् मारली. चेंडू खूप वर गेला, दूर गेला. खो खो खेळणाऱ्या मुली तर पहातच राहिल्या. संध्याकाळच्या निळया आभाळांत तो घारीसारखा दिसला, चंद्रासारखा दिसला. कांहींजणींना दिसलाच नाहीं. इमारतीच्या आड तो पडला तेव्हां मुलांनीं धांवत जाऊन आणला व खेळ परत सुरू केला.

मुलें खेळूं लागलीं तरी मास्तर तसेच अवघडून उभे राहिले. चेंडू पडला त्या दिशेकडे पाहात राहिले. मैदानाच्या त्या किनाऱ्याला कुणीं उभे होते. पांढरा पदर लपेटून घेतलेली, सांवळया वर्णाची कुण्या स्त्रीची आकृति ! खेळ पाहत उभी असणारी ती स्त्री कोण अन् आपण तिच्याकडे कां पाहत आहोंत हें रेग्यांना उमगेना. पलीकडच्या कॉलनींतल्या श्रीमंत स्त्रिया कधीं कधीं खेळ पहात उभ्या राहत. पण ती त्यांपैकीं नव्हती, नसावी ! पदर वाऱ्यावर वाहत सोडणारी, तोंड रंगविलेली व पाय चाळवणारी नव्हती ती. तिची शांत सोज्वळ मूर्ति नेहमींच्या प्रेक्षकांहून वेगळी वाटत होती. आकाशांत पसरलेल्या मावळतीच्या गूढ व प्रसन्न प्रकाशासारखी भासत होती.

रेगे भानावर आले व मुलांच्या घोळक्यांत घुसले. लोखंडी कडींत चेंडू टाकण्याकरितां सारे उड्या मारीत होते. सर सामील झाल्यावर खेळाचा

रंग बदलला. भराभर गोल होऊं लागले. बराच वेळ गेल्यावर रेग्यांनीं पाहिलें तों ती स्त्री तिथेंच तशीच उभी होती. त्यांना तिचें आश्चर्य वाटलें; व स्वतःचेंही आश्चर्य वाटलें. त्यांना तरी बघ्या लोकांशीं, एका बाईशीं काय कर्तव्य होतें ? ओशाळून ते वळाले व हुतुतूच्या पाटीशीं उभे राहिले. मग थोड्या वेळानें खोखोच्या खेळाशीं आले—

मधाशीं थांबलेला खोखोचा खेळ सुरू झालाच नव्हता. मुली खुंटाशीं जमल्या होत्या, कुजबुजत होत्या. रेग्यांना समजेना. सरांना पाहतांच कुजबूज कमी झाली अन् मोठ्या आवाजाची एक मुलगी धिटाईनें म्हणाली, "सर, त्या पहा संस्कृतच्या मुजुमदारबाई ! अय्या –त्या इकडेच येताहेत —"

मुली त्या दूरवर उभ्या असलेल्या स्त्रीबद्दलच बोलत होत्या. अन् ती आकृति आतां हंसासारखी हळूहळू पुढें येऊं लागली. मुलींच्याकडें; रेग्यांच्याकडें !—रेग्यांना वाटले, ह्या पोरट्यांच्या पुढ्यांत भेट नको. ते आपण होऊनच पुढें झाले.

ती स्त्री जवळ आली. मंद स्मित करीत म्हणाली, "माझं नांव संध्या मुजुमदार. गेल्या महिन्यांतच मी नौकरीवर आलें. पांचवीचं संस्कृत घेतें. हेडमास्तरांनीं मला मुलींच्या गेम्सकडेही बघायला सांगितलं आहे—"

रेगे बघतच राहिले. ताठरपणें अगर थिल्लरपणें, लायब्ररींत अगर व्हरांड्यांत मिरवणाऱ्या मास्तरणींच्या मेळाव्यांत ही मुजुमदार कधींच दिसली नव्हती. त्यांतली कुणी शिष्ट बाई आपल्याला मदतनीस म्हणून येऊन खेळांचा खेळखंडोबा करून टाकील अशी त्यांना सारखी भीति होती. अन् आतां ही गंभीर स्त्री अकस्मात् त्यांच्यासमोर उभी राहिली. सहाय्यक म्हणून आली.

पण तिच्याकडें पहात राहणं अप्रशस्त होतं. किती सौम्य, सभ्य होती ती ! मागच्या बाजूलाच मुली एक श्वासानें व अनेक डोळ्यांनीं पाहात होत्या. तिकडे नजर टाकीत ते म्हणाले, "माझं नांव रेगे, माधव रेगे—"

"माहीत आहे मला. हेडमास्तरांनीं सांगितलं—"

माधवनें आनंदून तिच्याकडे पाहिलें. त्याला उगाचच स्वतःचा अभिमान वाटला. स्वतःच्या डौलदार, पिळदार बाहूंकडें त्यानें पाहिलें. अन् पुन्हां तिच्या घडी घातलेल्या हातांकडें पाहिलें.

दोन पावलं मागें सरून संध्या म्हणाली, " तुमचे खेळ सुरू होऊं द्या. मी बाजूला उभी राहत्यें—"

त्याबरोबर माधव वरमला. त्याला आपल्या वेड्या दृष्टीची लाज वाटली. आणि अर्ध्या विजारीचीहि. संध्या किती टापटीपीनें उभी होती, प्रौढपणें बोलत होती !

तो म्हणाला, " खेळाची वेळ संपलीच आहे. तुम्हांला कांहीं घ्यायचं असलं—"

" नाहीं नाहीं. तुमच्या कार्यक्रमांत मला मुळींच बदल करायचा नाहीं."

माधवला काय बोलावं कळेना. त्यानें शिट्टी वाजवून सर्व खेळ थांबवले. मुलांना जमवून अर्धवर्तुळाकार उभें केलें. मग मुलींनीं प्रार्थना म्हटली.

" तुमची प्रार्थनेची पद्धत मला फार आवडली—" प्रार्थना आटोपल्यावर संध्या म्हणाली. माधव पुन्हां गप्पच राहिला. प्रार्थना चालू असतांना निश्चल उभी असलेली तिची मूर्ति पाहून तो भारावून गेला होता. तिच्या अस्तित्वानें प्रार्थनेला जणू योग्य वातावरण निर्माण झालें होतें ! खेळापेक्षां आज प्रथमच त्याला प्रार्थनेचा कंटाळवाणा कार्यक्रम अधिक आवडला होता.

" बरं, जातें मी. उद्यां उशीर नाहीं करणार—" नमस्कार करून ती म्हणाली. मुली हंसल्या. भानावर येऊन माधवनेंही हंसल्यासारखें केलें. मुलींच्यांत मिसळून मोकळेपणानें हंसत बोलत ती निघाली होती तिकडे तो पहात राहिला. एखाद्या मोठ्या बहिणीसारखी ती मुलींशीं वागत होती, मुलींना गोळा करून जात होती.

हलुंहळूं ती दिसेनाशी झाली. मुलें तर आधींच अदृश्य झाली होतीं. मोकळ्या मैदानावर माधव एकटाच उरला. अन् मग त्याच्या एकदम लक्षांत आलें कीं संध्या विधवा आहे ! तिच्या कपाळीं कुंकूं नव्हतं, गळ्यांत मंगळ-

सूत्र नव्हतं...हें लक्षांत कसं नाहीं आलं ? जाणवलं कसं नाहीं ? त्यानें तिची मूर्ति मनश्चक्षुंपुढें आणली. त्याच्याकडे येणारी, दोन पावलं दूर सरणारी, हंसून नांव सांगणारी, प्रार्थनेला निश्चल उभी असलेली. हो, ती गतधवाच होती. अन्–अन् म्हणूनच मोहक वाटत होती. म्हणूनच ! माधव दचकला. एखाद्या स्त्रीबद्दल फार विचार करणं, संध्येसारख्या स्त्रीबद्दल भलतंच वाटून घेणं पाप होतं. पण वैधव्याच्या वैगुण्यामुळें संध्येच्या सोज्जळ स्वरूपाला उलट वेगळंच तेज आलें आहे हा विचार कांहीं त्यांच्या मनांतून पुसला जाईना...

कितीतरी वेळ तो खोखोच्या खुंटाशीं भारावून, भांबावून उभा होता ! त्याच अवस्थेंत तो आपल्या खोलीकडे परतला, खोलींत बसून परत विचार करूं लागला...

* * *

घड्याळाच्या घंटीनें माधव जागा झाला. पहांटेचे पाच वाजले होते. तोंड धुऊन त्यानें कपडे काढले. खोलींतल्या मोठ्या आरशासमोर आसनें केलीं. अर्धा पाऊण तास रोजचा व्यायाम केल्यावर त्याला बरें वाटलें. छोट्या टॉवेलानें घाम पुशीत तो खोलींत फेऱ्या घालूं लागला. त्यानें खिडकीचा पडदा सरळ केला, टेबलावर दौत उघडी होती ती बंद केली. रात्रीं चाळायला घेतलेलें “ चित्रपट ” मासिक पलंगावरून पडलें होतें. नर्गिस, गीता बाली, हंसा वाडकर याच्या चित्रांनीं भरलेलें तें चोपडें उचलून ठेवलें.

जमना ! न्यू थिएटर्सची नटी जमना. माधवला अचानक जमनाची मूर्ति आठवली, डोळ्यांपुढें तरळली. त्यानें अधीरतेनें तें मासिक उचललें व अस्वस्थपणें चाळलें. अनेक नव्या नट्यांचीं नाना तऱ्हांचीं चित्रें पानापानांवर होतीं. पण जमनाचें नांवही कुठें नव्हतें. मासिक फेकून देऊन तो खुर्चीवर बसला. कसला तरी साक्षात्कार झाला ह्या जाणीवेनें त्याचें डोळे चमकत होते. संध्या मुजुमदार बरीचशी जमनासारखी दिसते. जमनाहून जरा जाडजूड, पण चेहऱ्यावरचे भाव तेच, तसेंच ! शांत, सौम्य, सात्त्विक, सोज्वळ. ओढ लावणारे, अन् त्याचबरोबर आदर उत्पन्न करणारे. आणि जमना तर त्याची एके काळची आवडती नटी होती ! माधव आनंदित झाला, परत अस्वस्थ

झाला. जमनाचें चित्र पाहायची त्याला अनिवार इच्छा झाली. संध्येला पाहायची उत्कंठा लागली.

खुर्चीवरून तो उठला व कपडे करूं लागला. गेले पंधरा दिवस रोज संध्याकाळीं संध्येचा सहवास त्याला लाभला होता. अर्ध्या तासाच्या त्या तुटपुंज्या भेटींत तो तिच्याकडे अधिकच आकर्षित झाला होता. जरूरीपुरतीं चार वाक्यं ती बोले व एखादें वेळींच मंदसं हास्य करी. ऐसपैस चकाट्या पिटणं आणि अघळपघळ हंसणं तिच्या स्वभावांत नव्हतंच! अन तिच्याशीं वागतांनाही मर्यादा सोडायचं मनांत येणं शक्य नव्हतं. माधवला संध्याकाळचें एक एक सोनेरी क्षण आठवले. वेळेवर ती हजर होई व माधवला अभिवादन करी. ठराविक वेळीं ती परत जाई व जातांना मंद स्मितानें निरोप घेई. वेळ कधीं चुकली नाहीं, वागणं कधीं बदललं नाहीं. पदर खोचून ती इतर मुलींसारखी धांवे, खेळे. पण त्यांतही डौल, टापटीप उठून दिसे. मुलींना करड्या वागणुकीनें तिनें शिस्त लावली व ळळाही लावला. अन माधवशींही मर्यादा ठेऊन तिनें संपूर्ण सहाय्य केलें...माधवला तिची डौलानें धावणारी आकृति दिसली. गंभीरपणें प्रार्थनेला उभी असलेली मूर्ति दिसली. मुलींच्याकडें ती कठोर मुद्रेनें पाहत होती. माधवला म्हणत होती, ‘ माफ करा–उद्यांच्या आंतरशालेय सामन्यांत मी येऊं शकत नाहीं. मला ती गजबज, वर्दळ सहन होत नाहीं—’...

आठवणींच्या गर्दीमुळें कपडे करण्यांत, खोली बंद करण्यांत माधवचा गोंधळ होऊं लागला. शनिवारची सकाळची शाळा असल्यानें आज गेम्स बंद होत्या. संध्या भेटणार नव्हती, दिसणार नव्हती. त्यामुळें माधव अधिकच उत्सुक झाला. संध्येला सहज पहाव ह्या उद्देशानें तो शाळेकडे निघाला.

समोर शाळेची इमारत दिसतांच मात्र त्याचे पाय थबकले. शाळा सुरू झाली असल्यानें एक प्रकारची विचित्र शांतता पसरली होती. कचेरींतलें कारकून खालीं माना घालून काम करीत होते. वर्गावर्गांतून शिक्षक शिकवीत होते व मुलें शांत बसलीं होतीं. छडी घेऊन हेडमास्तर हिंडत होते. आणि खेळाचे मैदान ओसाड पडलें होतें.

माधवला आपल्या उत्कंठेची, उथळपणाची शरम वाटली. काम नसतांना, कारण नसतांना तो वेडयासारखा शाळेत आला होता. संध्या मुजुमदार ह्या विधवा, सरळमार्गी, संस्कृत शिकवणाऱ्या व खेळांत मदत करणाऱ्या शिक्षकिणीला पाहायला ! त्याला तिची प्रौढ, करारी, गंभीर मुद्रा आठवली आणि तो अधिकच शरमिंदा झाला. त्याला वाटलं, असंच परत फिरावं, परत खोलीवर जावं. पण हेडमास्तरांनीं व्हरांडयांतून त्याला पाहिलें अन् त्याला शाळेंत शिरावें लागलें.

जिना चढून तो शिक्षकांच्या खोलीशीं आला. खुर्च्यांत रेलून व टेबलावर पाय टाकून तीन चार रिकामे मास्तर गप्पा मारीत होते. माधव आंत आला व कपाटांतलीं क्रीडाविषयक मासिकें पाहूं लागला. पानें चाळतांना त्याला घरीं पाहिलेलें “ चित्रपट ” मासिक आठवलें. पुन्हां जमनाचा चेहरा दिसला ! तो दूर झाला व टेबलाशीं आला. मराठीचे मोडक, गणिताचे काकडे आणि कुणी दोनतीन नवखे मास्तर गप्पा मारीत होते. मोडक नि काकडे असले कीं गप्पा हमखास स्त्रियांच्याबद्दल चालत. गांवांतल्या नि शाळेंतल्या बायकांची तेथें झडती होई. माधवला हें आठवलें व तो जवळच खुर्चीवर बसून आतुरतेनें ऐकूं लागला. ताज्या वर्तमानपत्रांतल्या कुठल्या तरी मुद्रणदोषावर त्यांचा उगाचच खल चालला होता. गप्पांचा ओघ बायकांच्याकडें वळत नव्हता नि माधव कंटाळून जात होता. अखेर तोच मध्येंच म्हणाला,

“ हेडमास्तरनीं नव्या मास्तरणींना चांगलेंच कामाला जुंपलें आहे. त्या सरवटे बाईला संमेलनाचं काम दिलं आहे, अन् शिंदेबाईला—”

मोडकांची कळी खुलली. “ ती सरवटे ना ? साऱ्या मुलखाची उठवळ. संमेलनाचं स्वयंवर करून टाकील ती. अन् शिंदेची भानगड—”

शिंदेची भानगड ऐकायची माधवला इच्छा नव्हती. घोगऱ्या स्वरांत तो घाईनें म्हणाला, “ अन् ती मुजुमदार. ती विडो हो-ती आमच्या गेम्समध्यें आहे. क्रीडा करायला--”

माधवनें डोळे किलकिले करून बोलणें बंद केलें. तेवढ्यांत काकडे म्हणाले,

"ती तुमच्याकडे आली तें ठीकच झालं. तुम्ही रुक्ष, नि ती रागीट! कशाला संस्कृत शिकवते कुणास ठाऊक—"

मोडक म्हणाले, "तिचं जाऊं द्या हो. वाघीण आहे ती. सांपडेल कधीं तरी जाळ्यांत! ह्या शिंदेबाईचं तर ऐका—"

माधवला शिंदेच्या शीलाची चर्चा ऐकूं आली नाहीं. संध्या मुजुमदारचें नांव निघतांच काकडे मोडकांसारखे कुटाळ वीर देखील भांबावले, बहकूं शकले नाहींत ह्याचा त्याला हर्ष झाला. तो तेथून हळूंच उठला व व्हरांड्यांत आला. समोरूनच शिंदे चालली होती. त्याला तिची दया आली. संध्येसारखं कठोर, करारी, कडक वर्तन ठेवणं सर्वजणींनाच शक्य नव्हतं. संध्येबद्दल त्याचा आदर वाढत गेला. आणि त्या प्रमाणांत ओढही! त्याचे डोळे तिला शोधूं लागले व पाय व्हराडा ओलांडूं लागले.

तो ग्रंथालयांत गेला व ग्रंथपालाला सरळ म्हणाला, "मुजुमदारांना पाहिलंत का हो कुठें?—संध्याबाई मुजुमदार?" त्याला आपल्या धिटाईचें आश्चर्य वाटलें व कुणी कुतूहल दर्शवलं तर काय बोलायचं हें तो ठरवूं लागला.

पण ग्रंथपाल घुश्श्यांतच म्हणाला, "मला नका विचारूं त्या बाईबद्दल. अहो, चांगलीं दोन पुस्तकं जास्त देऊं केलीं त्यांना, तर म्हणते, मला तुमची फेवर नको, नियमाप्रमाणें मिळतात तेवढींच द्या! आतां तुम्हींच सांगा रेगेसाहेब—"

रेगेसाहेब हंसूं लागले अन् ग्रंथपाल अधिकच चिडला. माधव म्हणाला, "बरोबर आहे त्यांचं—"

"बरोबर आहे?—मग त्या बाई आहेत तिकडे कपाटामागें. नियमाप्रमाणें पुस्तकं घेत आहेत—"

माधवच्या छातींत धडधडलें. तो कपाटाशीं गेला. पुस्तकं चाळीत संध्या तेथें उभी होती. पदर खोचून पळणारी अगर प्रार्थनेला तटस्थ उभी असलेली संध्या त्यानें पाहिली होती. पण पुस्तकं चाळणारी भारदस्त संध्या त्यानें पाहिली नव्हती. तरीही तीच ती संध्या होती. कडवी, करारी, सभ्य, सरळमार्गी! माधव भारावून गेला. पण त्याला पुढें जाववेना. शिक्षकांच्या

खोलींत अगर ग्रंथपालाच्या टेबलाशीं बोलतांना संध्येवर आपला विशेष हक्क आहे, आपला तिचा अधिक स्नेह आहे असं वाटत होतं, तें विरून गेलं. तें खोटं आहे हें त्याला जाणवलं. अन् तो जागींच खिळला.

तेवढ्यांत तिनें वळून पाहिलें. "ओ हो, तुम्ही—" ती हंसून म्हणाली. माधव सावध झाला, खुलला. "काहीं काम नाहीं ना ?" तिचा प्रश्न ऐकून त्याचा चेहरा पडला. "बाकी तुमचं काम म्हणजे खेळच !" ती म्हणाली व हंसली.

माधवला कोठून धीर आला कुणास ठाऊक ? तो एकदम म्हणाला, "काम कांहींच नाहीं. गप्पा मारायला आलों आहे. पीरिअड् नाहीं ना ?"

संध्येनें कपाटाचें दार लावलें व पुस्तकं उचललीं. तिची मुद्रा गंभीर, कठोर झाल्याचें माधवला दिसलें. तशी मुद्रा पाहातांच त्याच्या वृत्ति अधिकच खुलल्या ! तेवढ्यांत संध्या शांतपणे म्हणाली, "गप्पा कुठल्या मारणार ? पेपर तपासावयाचे आहेत. ह्या पुस्तकांच्या नोटस् काढावयाच्या आहेत. अन् आत्ता आमची संस्कृत शिक्षकांची सभा आहे. तांबे मास्तर माझी वाट पाहात असतील—"

ती निघालीच. माधव तिच्या मागोमाग कपाटाआडून बाहेर आला. "जातें हं–" ती जेमतेम म्हणाली व गेली. झपाट्यानें अदृश्य होणाऱ्या तिच्या आकृतीकडे तो पाहात राहिला. त्याच्या आशा ओघळून गेल्या होत्या. पण तिचं तुटक बोलणं, तडफदार वागणं ह्यानें तो अधिकच आसासून गेला. अशीच ती दूर जावी, दूर राहावी, असं त्याला वाटलं. अन् ती दूर जाते, दूर राहते, म्हणूनच आपल्याला आवडते हें त्याला पुरेपूर पटलें...

* * *

विजेची घंटा वाजवून माधव बंद दारापुढच्या अरुंद पायरीवर चुळबुळत उभा राहिला. संध्या मुजुमदारच्या बिऱ्हाडीं गेल्या चार महिन्यांत तो पांच सहा वेळां आला होता. पण दर खेपेस त्याला पहिल्या भेटीप्रमाणें अस्वस्थ वाटत असे. संध्या स्वागत कसें करील, आपल्या बोलण्यांत वावगें जाणार नाहीं ना, आपण आलों हेंच वाईट दिसतें कां ?......

आंतून रेडिओ ऐकूं येत होता तो थांबला. रेडिओंतली भजनाची रेकॉर्ड थांबतांच माधवच्या हृदयांत धडधड वाढली. त्यानें कोटाची कॉलर सारखी केली, कपाळावरचे केस मागें केले. चेहरा शक्य तितका शांत, सौम्य केला. दार उघडलें गेलें. त्याला वाटलें, संध्या असेल. पण संध्येच्या मावशी होत्या. " बसा–बसा. संध्या बाहेर गेली आहे. येईलच इतक्यांत" मावशी म्हणाल्या. तो जरा नाराज झाला व दाराजवळच्या खुर्चीवर बसला.

मावशी पदरानें वारा घेत व हवेबद्दल बडबडत त्याच्या समोरच्या खुर्चीवरच बसल्या. माधवच्या मागल्या भेटींतच मावशींचें त्याच्याबद्दल चांगलें मत झालें होतें. आपल्या अघळ पघळ गप्पा ऐकून घेणारा एकमेव श्रोता मिळाला म्हणून त्या खूष होत्या. पण माधव नाईलाजानें वेळ काढीत होता. इकडे तिकडे पाहत होता. खोलींतली सारी सजावट त्याच्या परिचयाची होती. खिडक्यांचे पांढरे शुभ्र पडदे, कपाटावरचीं शिकवण्याचीं पुस्तकें, कोनाड्यांतली बुद्धाची छोटी मूर्ति, टेबलावर टाकलेला खादीचा रुमाल व त्यावर ठेवलेलीं प्राजक्ताचीं फुलें. जास्ती वस्तू होत्या कुठें ? पण तेवढ्याच वस्तूंनीं खोलीला वेगळंच वातावरण आणलं होतं. त्या वस्तूंनीं संध्येची अधिकच आठवण येऊन'माधवनें डोळे मिटून घेतले.

मावशींनीं माधवची अस्वस्थता ओळखली. त्या परत वारा घेत म्हणाल्या, " संध्या येईलच आतां. त्या विम्याच्या भानगडीसाठीं गेली आहे. नवऱ्याच्या विम्याचे पैसे मिळायचे होते. आहेत पांचशेंच, पण तीन वर्षं चाललंय—"

माधव चमकला. त्याला विचित्र वाटलें. मावशीकडें पाहात तो म्हणाला, " पण मिस्टर मुजुमदार श्रीमंत होते ना–"

त्याला वाटलं, मावशी रागावतील. पण त्या हंसून म्हणाल्या, " कुणीं सांगितलं तुम्हांला ! दमडी नव्हती लग्न झालं तेव्हां. अन् अखेरच्या आजारपणांत संध्येचे सारे दागिने संपवून गेला. जास्त माहिती न काढतां बापानें मुलगी दिली सोन्यासारखी. "

माधव थक्क झाला. कसाबसा म्हणाला, " म्हणजे ? त्यांचा प्रेमविवाह नव्हता ? "

आतां मात्र मावशी रागावल्या. “ आमच्या संध्येला असलीं थेरं ठाऊक नव्हतीं हो ! अगदीं सालस आहे माझी भाची. बापानें दाखवून दिलेल्या मुलाच्या गळ्यांत मुकाट्याने माळ घातलीन्. अन् तितक्याच आज्ञाधारकपणें संसाराचा मोडका गाडा ओढलान्. एवढं कशाला ? नवरा मेला तेव्हां माहेरचा नि सासरचा आधार उरला नाहीं. पण अडून न राहतां तिनें धीरानें दिवस काढले. शिवणकाम केलं, शिकवण्या केल्या. ही शेवटची परीक्षा देऊन परवां मास्तरीण झाली. खूप सोसलंन्, पण कधीं मान वांकवली नाहीं कीं तोंड वेंगाडलं नाहीं —”

मावशीबाई भाचीच्या कौतुकांत रंगून गेल्या. कधी अभिमानानें त्यांचें तोंड लाल होई. तर कधीं आठवणीनें डोळे ओले होत. माधव मात्र वेगळ्याच मनःस्थितीत गेला. त्याची कल्पना होती कीं संध्येचा प्रेमविवाह होता आणि म्हणून आतां ती इतकी पोळली आहे. पण ती प्रियकर गमावलेली विधवा नाहीं, साधी विधवा आहे हें ऐकून त्याला वेगळेंच वाटलें. संध्येच्या कडव्या वर्तणुकीबद्दल अधिकच आदर वाटू लागला. वैधव्यांतली ही वागणूक अधिक कौतुकास्पद होती ह्यांत काय संशय ?

तेवढ्यात संध्या आली. माधवला पाहून म्हणाली,

“ केव्हां आलात ?-”

“ आत्तांच-”

“ माफ करा हं, जरा उशीर झाला-”

बोलता बोलतां कपाळावरचा घाम तिनें टिपला व ती बाजूच्या खुर्चीवर बसली. माधवनें तिच्याकडे क्षणभर बघितलें. तिच्या पांढऱ्या पातळाकडें, पांढऱ्या कपाळाकडें.

मग तो म्हणाला, “ मिळाले विम्याचे पैसे ?—”

कपाळावर सहस्र आंठ्या घालून संध्या उद्गारली, “ कुणीं सांगितलं तुम्हाला ?—”

“ मावशी म्हणत होत्या— ” माधव आंतघराकडें दृष्टि टाकीत म्हणाला.

" आमची मावशी कुणाबरोबर कांहींही बडबडत असते !...बसा हं, मी चहा आणतें—"

संध्या रुक्षपणें बोलली व आंत गेली. आपल्याबरोबर ती अशी कडवटपणें बोलली हें माधवला रुचलें नाहीं. पण तिच्या खाजगी गोष्टीबद्दल विचारणा करण्यांत आपण चूक केली असंही त्याला बजावून वाटलें. ती बाहेर आल्यावर दिलगिरी दाखवण्याचें त्यानें ठरवलें.

चहाचा कप बाहेर घेऊन ती आली. तिचा चेहरा नेहमींसारखा सौम्य झाला होता. चहा संपतांच ती म्हणाली,

" चला. जायचं ना आपण ?—एकाच दुकानांतून बक्षिसाचे पेले घ्यायचे आहेत ना ? कीं बाजारभर हिंडायचंय ?—"

माधव उठत म्हणाला, " दर वर्षींचा ठरलेला सराफ आहे. तेथूनच खरेदी करूं—"

आरशांत न पाहतां, केसांवरून फणी न फिरवतां ती तशीच निघाली. खोलींत नजर टाकायला आरसा होताच कुठें ?– माधवला वाटलें, आपणच जास्त नटलों आहोंत. गेमटीचरनें उकडत असतांना फ्लॅनेल पँट घातलीच पाहिजे असं नाहीं. संध्येच्या सोज्वळ आकृतीला साधंच पातळ शोभून दिसतं, तसं आपल्या पीळदार शरीराला साधा धोतरकोटच चांगला दिसला असता...

शाळेच्या बक्षिससमारंभासाठीं त्यांनीं पेले व पदकें खरेदी केलीं. निवडलेला माल दुकानदाराला दुसऱ्या दिवशीं शाळेंत पोंचवायला सांगितला व ते परत फिरले.

मग माधव म्हणाला, " आपण आईस्क्रीम खाऊं या..."

कानशिलापासचें केस मागें घेत संध्या म्हणाली, " नको बाई. आईस्क्रीम आवडत नाहीं मला... "

घामानें तिचे कपोल भिजलेले माधव पहात होता. तो म्हणाला, " मग ड्रिंक घ्या. दुसरं कांहीं घ्या..."

नाकासमोर पाहात ती म्हणाली, " खरचं नको. मला हॉटेलांत जायला आवडत नाहीं..."

माधवाला तें आवडलें. पण तरीही तो रुष्ट झाला. जरा वेळ तिच्यासारखा निमूटपणें चालला. मग पुन्हां म्हणाला, " टांगा करायचा का ?

संध्या आता निराळ्या तऱ्हेनें टाळाटाळी करूं लागली, " उशीर कुठें झालाय ?–टांग्यातून कुठें धडपडत जायचं ?–तुम्हाला जायचं असलं कुठें तर जा ना; मीं जाईन एकटी !– – "

माधव पुन्हां गप्प राहिला. त्याचें मन विषादानें दाटून गेलें. बाजार मागें टाकून ते मोकळ्या रस्त्यावर आले तेव्हां दृढपणें तो म्हणाला," एक विचारूं का तुम्हांला ?–

संध्या थबकली. कापऱ्या स्वरात म्हणाली, " काय ? "

ती थरथरली, घाबरली, हें माधवाला स्पष्ट उमगलें. छे, तो नुसतं विचारणार होता, ' मी तुमच्याबरोबर असलो तर तुम्हांला तें आवडत नाहीं कां ? जुलुम वाटतो कां ? – मला तुमच्याबद्दल आदर आहे. पण तुम्ही माझा द्वेष तर करीत नाहीं ? – ' पण तो तसं बोलूं शकला नाहीं. अंमळशानें इतकंच म्हणाला, " माझ्या वागण्यात चुकलं असलं कांहीं, तर माफ करा —"

त्याबरोबर तिनें हंसल्यासारखें केलें. " असं कुठं म्हटलं मी ? तुमचं कांहीं चुकलं नाहीं. पण माझं वागणं तुम्हांला चुकीचं वाटलं तर तें वाटणं मात्र चुकीचं आहे–" ती म्हणाली व झपझप चालूं लागली.

त्याला आपली चूक पटली. तो तिच्याबरोबर मुकाट्यानें, वेगानें चालूं लागला. असंच एकमेकांशीं न बोलतां, न बघतां, न संपणारी वाट चालत राहावं असं त्याला वाटलं....

* * *

स्टेशनवरची घंटा घणघणली, शिट्या वाजल्या व गाडी सुटली. माधव दारापासून दूर झाला. बाकावर ठेवलेली बॅग त्यानें खालीं सरकवली, टेनिसच्या रॅकेटस् वर टाकल्या व खिडकींतून तो बाहेर पहात बसला. सुट्टीचा फायदा घेऊन तो टेनिसचे सामने खेळायला पुण्यामुंबईकडे हिंडला होता. बहुतेक सामने तो चांगले खेळला; बरेचसें त्यानें जिंकलेही होते.

पण खिडकींतून बाहेर बघतांना त्याला सामन्यांच्या आठवणी येत नव्हत्या. सामने खेळतांना देखील त्याचें मन तितकेसें रमलें नव्हतें. जयश्री मिळविण्याच्या हिरीरीने तो निघाला होता खरा, पण निघाल्यापासूनच त्यानें ठरवले होतें कीं सामने सुरू व्हायच्या आधीं संध्येला पत्र लिहायचें! पुढल्या वर्षाकरितां तिची तात्पुरती नेमणूक चालू झाली नाहीं तर ती दुसऱ्या शाळेत खटपट करील, दुसऱ्या गांवीं देखील जाईल, ह्या विचारानें तो व्याकुळ झाला होता प्रवासाला निघण्यापूर्वी प्रेमयाचना करण्याच्या उद्देशानें तो तिच्याकडे गेला होता. पण तिच्या मोजक्या बोलण्यानें व मर्यादशील वागण्याने त्याला हृदय उघडें करायची संधीच सांपडली नाहीं. पण त्यामुळें तो अधिकच दृढनिश्चयी बनला. परगावाहून पत्रद्वारां प्रेम प्रकट करणं हाच खरा सभ्य, सोज्वळ मार्ग होता! मोजक्या शब्दांत व मोघम भाषेंत पत्र लिहून त्यानें तें रवाना केलें व तो पहिली मॅच खेळला. विजयी झाला. पंधरा दिवसांनी तिचें पत्र आलें. तेव्हां त्यानें बरेच सामने जिंकले होते; बरेच घालवले होते.

डब्याच्या खिडकीशी उन्ह आल्यानें माधवनें तोंड आंत वळवलें. कोपऱ्यांत बसलेलं जोडपें सर्वांसमक्ष प्रणयचेष्टा करीत होतें. माधवला किळस आली, चीड आली. स्त्रीपुरुषांनी इतका उथळपणा, उठवळपणा दाखवावा ह्याचा त्याला खेद वाटला. सामना संपतांच त्याच्याभोंवतीं गोळा होणाऱ्या थिल्लर मुली त्याला आठवल्या. ओळख नसताना कुणी हस्तांदोलन करीत, कुणी कुठंशी तरी ओळख काढून लगट करीत. माधवला शिसारी आली. त्यानें तोंड फिरवलें. वेळ कसा काढावा, कळेना त्याला. खिशांत संध्येचें पत्र होतें तें काढून वाचावें...

पण त्याला स्वतःची लाज वाटली. भर डब्यांत उगाचच पत्र वाचायचं? आपण देखील इतकी आतुरता, ओढाळपणा दाखवायचा? त्यानें आपली इच्छा दाबून टाकली. पण त्याच्या डोळ्यांपुढें पत्र तरळत राहिलें. पूर्ण पंधरा दिवसांनंतर पत्र आलें होतें. माधवला तो दीर्घ अवधि फार आवडला. धडपड, लगबग, आतुरता हें संध्येच्या स्वभावांतच नव्हतें. जसजसें दिवस गेले

तसतसें त्याला एक प्रकारें समाधानच वाटलें. अन् मग संध्येचें उत्तर आलें.. पोस्टाचें साधें पाकीट ! माधवाचें हृदय धडधडलें होतें.

'माधवराव यांसी नमस्कार—' त्याला तो मायना आवडला. पांच ओळींच्या पत्रांत अशीच सभ्य सरळ भाषा होती. गंभीरपणें तिनें होकार कळवला होता...ओठ घट्ट मिटून, मुद्रा गंभीर करून ती शांतपणे पत्र लिहीत आहे हें माधवला ओळीओळींत दिसलें होतें. आतांही पुन्हां दिसूं लागलें.

उन्हं उतरलेलीं दिसल्याने माधवने पुन्हां खिडकीकडे तोंड केलें. बाहेर दिसणाऱ्या मोकळया माळरानावर त्याला संध्या दिसं लागली. जणूं खेळाच्या मैदानावर ती प्रार्थनेला उभी होती. धावत्या गाडीबरोबर तिचीं अनेक रूपें त्याला आठवलीं. मंद हास्य करणारी, डौलानें धावणारी, झपझप चालणारी, गंभीरपणें हाताची घडी घालून पाहणारी...किती प्रशांत होती, पवित्र होती ती ! किती सात्त्विक, सोज्वळ...माधवचें मन भरून आलें.

त्याला वाटले, आपलं भणंग आयुष्य संपल आतां. एकुलती एक मोठी बहीण शेजारीं राहणाऱ्या तरुणाबरोबर पळून गेल्यापासून तो एकटा पडला होता, उघडा पडला होता. तिच्यामुळें त्याला उगाचच त्रास झाला. नातलगाचा, स्त्रियांचा संपर्क टाळून त्यानें तालीम करण्यांत वेळ काढला म्हणून तो सुटला. आणि आतां सारेंच संपलें. त्याच्या एकमार्गी आयुष्याला आतां अर्थ आला होता. आता भारदस्तपणें, जबाबदारीनें तो जगणार होता.

संध्येची त्याला परत आठवण आली. आतां भेटल्यावर ती किती सभ्यपणें, शांतपणें बोलेल हें त्याला दिसलें. लग्नाचा विधि कुठें तरी दूर करायचा, गाजावाजा न करतां साधाच करायचा असा आग्रह धरील. हनी-मून !—हनीमूनचें नांव काढताच कठोरपणें पाहणारी संध्या त्याला दिसली व तो कावराबावरा झाला. आपल्या विचारांची त्याला शरम वाटली. आतां कसलाच विचार करायचा नाहीं. प्रवास संपल्यावर घरीं जायचें, शांत झोंपायचें, सावकाश संध्येला भेटायचें, सोयीनें लग्न करायचें व संथपणें आयुष्य काढायचें...

त्याला आपल्या संयमाचें कौतुक वाटलें. बॅगेंतून पुस्तक काढून तो वाचनांत गर्क झाला. किती तरी वेळ तो शांतपणें वाचीत होता. हळूहळू पूर्ण अंधार पडला. गाडींतले दिवे लागले, गांवांतले दिवे दिसू लागले. मग तो भानावर आला. पुस्तक ठेवून देऊन त्यानें सामान गोळा केलें व फलाटाशीं गाडी थांबल्यावर तो सावकाश खालीं उतरला.

समोरच संध्या उभी होती !

माधवला प्रथम खोटें वाटलें, भास वाटला. पण ती सामोरी येत म्हणाली, " ओळखलं नाहीं ना ?—पंधरा दिवसांत परके झालांत ?–"

माधव डोळे फाडून, तोंड उघडून, पाहात राहिला. अजून त्याला उमज पडेना. अजून त्याचा विश्वास बसेना. पण विचार करायला वेळ नव्हता. हातांतलं सामान सांवरायचं होतं, मागून येणारीं माणसं आंवरत नव्हतीं. गर्दींत तीं दोघें बाहेर आलीं.

" टॅक्सीनें जाऊ ना ! मी टॅक्सी ठरवली आहे सुद्धां–" संध्या त्याची बाही ओढीत लाडिकपणें म्हणाली. माधव अजून भानावर आला नव्हता. संध्या नव्हतीच ती, दुसरीच कुणी बया होती ! तेवढ्यांत टॅक्सी त्याच्या पुढ्यांतच आली. धडपडत तो आंत बसला. संध्या त्याला बिलगून बसली. गाडी वेगाने निघाली. माधव घामानें थबथबला होता. त्याची छाती धडधडत होती व डोक्यांतले कोडें वाढतच होतें. संध्या त्याला खेटून बडबडत होती, " मी वाट पहात होतें...म्हटलं आज येतां कीं नाहीं ? मावशी गांवाला गेली आहे...आमच्या घरीं जाऊं, मी जेवण करून ठेवलंय्... बोलत कां नाहीं...? "

संध्येच्या घराशीं गाडी थांबली. माधव मेल्यासारखा तिच्या मागोमाग घरांत गेला. खोलींतला दिवा लागतांच त्याला संध्या स्पष्ट दिसली. दाराजवळच्या खुर्चीवर तो कसाबसा टेकला व हातांतल्या रॅकेट्स् सांवरीत भकासपणें तिच्याकडे पाहूं लागला. ही संध्या ? शेपटा सोडलेली, पांच वारी रंगीत पातळ नेसलेली, मान वांकडी करून लाडीक बडबड करणारी, रोमांचांनीं ओली चिंब झालेली ! ही संध्या कशी ? ही कुठली संध्या !

त्याला हवी असलेली, ज्या आकृतीवर तो लुब्ध झाला ती संध्या कुठाय् ? सभ्य, सालस, करारी, कडवी ? ही ती नव्हती; ही त्याला नको होती ! ही तर कुणी कांत टाकलेली कुलटा होती...संध्येचें तें स्वरूप पाहून माधव कोमेजून गेला, काळानिळा पडला.

संध्येनें खोलीचे पडदे ओढून घेतले व भिंतीवरच्या नव्या आरशांत मुरकत ती म्हणाली, "बोलत नाहीस ? रागावलास?–हांस ना ! सारे संकटाचे, कष्टाचे दिवस संपले आतां ! पण तें तत्त्वज्ञान देखील नको. दमला असशील ना ? आधीं कॉफी करतें हं–"

अंत:पुरांत अंतर्धान पावणारी तिची आकृति तो केविलवाण्या मुद्रेनें पहात राहिला. ती गेल्यावर त्याला सुटल्यासारखे वाटलें. पण पुन्हां त्याला कांपरें भरलें. ती त्याच्याशीच, त्याच्यासाठींच बहरली होती. पण–पण–तो बावरून भोवतालीं पाहूं लागला. नवा आरसा, नवें फुलदान, नवी बाजाची पेटी–सारें सारें फुटत आहेसं त्याला वाटलं. मद स्मिताचे फुटलेले स्वर, सोज्वळतेचे कुजट निर्माल्य साऱ्या खोलीभर विखुरल्यासारखं वाटत होतं. आणि कोनाड्यांतली बुद्धाची प्रतिमा ही तर दिसत नव्हती ! त्याला भयंकर गुदमरल्यासारखं झालं. अर्धवट उघड्या असलेल्या दरवाजाच्या फटींतून तो वेड्यासारखा बाहेरच्या काळोखाकडे पाहात राहिला....

★ ★ ★

# कराची

कराचीच्या बंदर रोडवरून रँग्लर राजवाडे चिवड्याची गाडी ढकलीत चालले होते.

बंदर रोड गजबजून गेला होता. संध्याकाळच्या शांत झुळकांचे झोत सुटले होते. शाळाकचेऱ्यांतून मुलेंमाणसें घाईनें घरांकडें जात होतीं. ट्रमदार ट्रॅम्स वेगाने धांवत होत्या. भरलेल्या बसेस व मोटारी उलमुलट धावत आवाज करीत पळत होत्या. प्रशस्त फूटपाथावरून रंगीबेरंगी कपडे घातलेलीं हंसरीं माणसें हिंडत होतीं. बाजूच्या मोठमोठ्या दुकानांत शिरत होतीं. बडबडत होतीं, गडबडींत येत जात होतीं.

" ए मराठा, चिवडा दे—" कुणी कृपलानी, मथराणी मुलें राजवाड्यांना थांबवून दोन आण्याचे, चार आण्याचे पुडे घेत होतीं. केसाळ हाताच्या नि रंगवलेल्या चेहऱ्याच्या हंसऱ्या गहिऱ्या सिंधी स्त्रिया थांबत होत्या, चिवडा खात होत्या.सिंधी शब्दांत किलकिलत होत्या. आणि आपली पगडी सांवरीत, फाटका बूट ओढून धरीत रँग्लर राजवाडे चिवड्याची गाडी ढकलीत होते. उघड्या मालावर उपरणें आंथरीत होते. मिळालेलीं नाणीं कनवटीला लावीत होते. आपली भव्य पण भकास मुद्रा चौफेर फिरवीत पुढे पुढे जात होते.

शिंद्याच्या बोट कंपनीच्या कचेरींतून मेजर माने बाहेर पडला. मुंबई बंदरांतून सिंधकडें निघालेल्या हिंदू निर्वासितांच्या तुकडीची व्यवस्था कशी करायची, ह्या कामगिरींत तो गुंतलेला होता. दर दिवसाआड मुंबईहून हजारों माणसें येत होतीं. मुंबईचीं, कोंकणचीं, घाटावरचीं. साऱ्या महाराष्ट्रांतून लुटले गेलेले, हांकलले गेलेले निराश्रित न संपणाऱ्या संख्येनें कराचींत उतरत होते. सर्वांची सोय कुठें करायची, हें सरकारला कळत नव्हतें.मानेला कळत नव्हतें. इदगा मैदानावर, मराठी मंडळामागें, हैद्राबादला, सकरंदला, तंडो आदमला अनेक छावण्या उभारल्या होत्या. गांवांतून, घरांतून निर्वासित भरले होतेच.

तरीपण हजारों हातभागी जीव स्टेशनवर, रस्त्यांवर, उघड्यावर जगत होते. आणि अधिक माणसें येत होतींच—

गाडी ढकलणाऱ्या प्रिन्सिपॉल राजवाड्यांची विचित्र मूर्ति पाहून मेजर माने चमकला. बरा साला चिवडा विकतो आहे ! त्यानेंच मानेला कॉलेजांतून काढलें होतें. गणिती अन भटजी. पण मानेचें मन गाडीवरून गेलें. तो जवळ जाऊन म्हणाला, " सर–मी माने. तुमच्या कॉलेजमध्यें होतों. कोल्हापूरला कुस्तीचा चँपियन होतों दोन वर्षांपूर्वी—"

राजवाड्यांनीं मानेला ओळखलें नाहीं. ओळखण्याचे श्रम घेतले नाहींत. हंसण्या बोलण्याचेंहि श्रम घेतले नाहींत. शेंडी सांवरीत ते तसेच पुढें निघाले.

गाडीची कड धरीत माने म्हणाला, " सर, चिवडा कशाला विकतां ? तुम्ही सरकारला अर्ज द्या ना–तुम्हाला छानशी नौकरी मिळेल. "

राजवाड्यानीं गोठलेल्या बुबुळांनीं त्याच्याकडे पाहिलें. माने वरमला. अर्ज केले, गुण असले, तरी मराठी निर्वासिताला नौकरी मिळणें मुष्कील आहे हे त्याला ठाऊक होतें. गाडीबरोबर चालत तो जराशाने म्हणाला, " निदान अर्ज टाकून ठेवा ! अन् कांहीं झालं तरी असे हिंडूं नका तुम्ही–तुम्ही क्लास कां काढीत नाहीं सर ? गणिताच्या क्लासची नुसती पाटी लावून बसा; कॉलेजच्या पोरांची झिम्मड उडेल नुसती ! ते पुण्याहून पळून आलेले प्रोफेसर्स काय करीत आहेत, वाटतं ? क्लास काढ, कोर्सेस् काढ, गाईड काढ –खूप गंमत चालवली आहे त्यांनीं. ते प्रोफेसर वास्वानी नि ते गाईड काढणारे सिंधी प्रकाशक भडकले आहेत त्यांच्यावर !...सर, तुम्ही क्लास काढा. असें हिंडूं नका..."

"चिवडा–दोन आणे,चार आणे,आठ आणे..."कांपऱ्या स्वरांत काळीज चिरणारी आरोळी ठोकून दमलेले राजवाडे थांबले. त्यांच्या छातींत पुन्हां दुखूं लागलें होतें. गाडीचें एक चाक लटपटत होतेंच. एक मोठीशी कढई कुठून मिळवावी हा एकच विचार करीत ते उभे होते.

शेजारच्या सुक्या फळांच्या दुकानांतला मालक सुंदरमल आपल्या पट्ट्यापट्ट्यांचा पायजमा घातलेल्या मेव्हण्याला म्हणाला,

" तो बघ–मराठी म्हातारा. रोज चिवडा विकत जातो वेड्यासारखा. दंग्यांत म्हणे त्याच्या मुली नि जांवई मारले गेले. त्याचं मोठं ग्रंथालय होतं तेंहि जाळलं. बुड्ढाबुड्ढी उंटखान्यामागं झोंपडी बांधून राहतात. मोठा प्रिन्सिपॉल होता, पण आतां बुद्धिभ्रंश झाला आहे—"

" ह्या मुंबईवाल्यांचा महारोगच झालाय् कराचीला ! हे शिवाजीचें वंशज भागूबाईसारखे पळून येतात अन् इथें मिजास करतात. प्रत्येक रस्त्यावर नि प्रत्येक बसमध्यें हे तिरसट मरगट्टे मारामारी करीत असतात-"

" अरे–पण हे परवडले ! मोठे प्रामाणिक नि कामसू तरी आहेत. मुनीम म्हणून, कारकून म्हणून कामाला लावायला फार उत्तम. पण ते सुरत अहमदाबादचे गुजराथी नि मारवाडी फार खोफनाक ! फाळणीआधींच सर्व चीजवस्त घेऊन आले इथें. एक्सटेन्शनमध्यें पाहिलंस ना, भराभर बंगले काय विकत घेतात, दुकानं काय थाटतात ! व्यापारांत नसती चताभेटी चालवली आहे बेट्यांनीं—"

मेव्हण्याचें मत बदललें नाहीं. मुंबईच्या महालक्ष्मीवरच्या एका शेटयाकडून त्यानें दोन खोल्यांच्या जागेसाठीं कालच पाच हजारांची पागडी घेतली होती. आणि उलट कॉलेज रस्त्यावर परवां संध्याकाळीं त्यानें व त्याच्या मित्रानें एका मराठी मुलीच्या साडीच्या कासोटयावर केवळ कुतूहलानें टीका केली तर दहाबारा निर्वासितांनी त्याचीं कानाशिलें सडकलीं होतीं.

दुकानासमोर नवी कोरी पॅकार्ड गाडी खडी झाली व बोलणे तेवढयावरच राहिलें.

गाडींतून गलेलठ्ठ गुजराथी बाया उतरल्या. तलम साडयांनीं तुकतुकीत शरीरें झालेलीं व हिऱ्यामोत्यांनीं गळ्याच्या वळ्या शृंगारलेल्या. पिस्ता, काजू, सुके अंजीर, मनुका—खरेदी चालू झाली, खाणं चालू झालं. मालक खूष होऊन गेला. उंटाच्या तुपाचें, पिस्त्याच्या बिस्किटांचें नि सुक्या फळांचें ह्या श्रीमंत शरणार्थींनीं विलक्षण वेड घेतलें होतें. मेव्हणा रस्त्यावर पाहात बसला. ट्रॅममधून गोल नेसलेली एक मराठी मुलगी जात होती. कासोटयावाल्या गोठाणी मराठणी तिखट असतील, पण ह्या शहरी दंडियावाल्या छोकऱ्या मऊ असतील, असा विचार त्याच्या मनांत घोटाळू लागला.

क्यामारीला ट्रॅममधून माणिक गुप्ते उतरली. पर्स सांवरीत, पदर सांवरीत पाहूं लागली. बाजूनें मधू कांबळे आला. दोघें हंसलीं, एका दिशेनें चालूं लागलीं.

मधू एकदम थांबला आणि माणिकचा हात पकडून म्हणाला,

" आपण लग्न करू–"

माणिकनें हंसण्याचा आवाज काढला. "आतां करायचं?-देवळांत येतोस? रजिस्ट्रारकडें येतोस? कीं असंच समुद्रांत जाऊन–"

"माणिक, माणिक" मधू आवेगानें म्हणाला,"मग आपण असंच रहायचं? तूं मराठी मंडळामागच्या छावणींत नि मी इथें कस्टमकचेरीच्या फूटपाथवर? आता कसली आडकाठी आहे ?–"

" हो–आतां कसलीच आडकाठी नाहीं. आडकाठी करणारे तुझे नि माझे वडील मारले गेले. फाळणीनें आपली वेगळी जात एक करून टाकली. आता कसलीच आडकाठी नाहीं खरी ! "

माणिकचे बोल मधूचे मन कापून गेले. त्याला वाटले, गिरगांवच्या रस्त्यावर स्त्रियाची सामुदायिक विटंबना झाली, माणिकची दोनदा अब्रू लुटली गेली, त्याला उद्देशून माणिक कडवटपणे बोलते आहे. माणिक मात्र मनापासून बोलत होती. गरीबाचें घराणे, हलकी जात, मुलींची विनयवृत्ति, सारें संपलें होते त्या संहारांत !–मधूजवळ राहणे त्यामुळेंच शक्य झालें होतें.

" माणिक, तुझं असं झालं म्हणून तूं लग्न टाळतेस ? मला जवळ करीत नाहींस ?– आपण आपलं जग उभारूं ! संसार थाटूं ! मी सायकल रिपेअरचं छोटंसं दुकान काढतों आहें मित्राच्या साहाय्यानं. पुणेरी सायकलवाला आहें मी. नक्की पैसे मिळवीन. जागा मिळवीन. पण तूं—"

" नाहीं मधू, मला तक्रारीला जागा नाही. तक्रार करणार माझी बहीण जी आज मुंबईत कुणा गुंडांच्या घरांत आहे ! माझा भाऊ तक्रार करतो, कारण डागळलेल्या बहिणीला तो जवळ करूं शकत नाहीं ! मला कांहींच सबब नाहीं. म्हणून–म्हणूनच मधू, आपण लग्न करूं या नको—"

माणिकनें भर रस्त्यावर मधूच्या कमरेभोंवतीं हात टाकला व आवेगानें

डोळे मिटले. तिचें मन मधूला समजेना. त्याला वाटलें, ह्यापुढें कुठल्याहि निर्वासित स्त्रीचें मन कुठल्याहि पुरुषाला कळणार नाहीं काय ?

" हरे राम ! ही कार्टी भर रस्त्यावर बेशरमपणा करूं लागली. इतके धिंडवडे निघाले तरी चिखलांत लोळावसं वाटतं ह्यांना ! नमःशिवाय !" दूरवरून पाहणारा पुणेरी म्हतारा पुटपुटला. पुन्हां पुन्हा घाम पुसत तो डोळे फाडून पाहात होता. पुन्हां पुन्हां पुटपुटत होता, " सारा धर्म धुळीला मिळाला. साऱ्या संस्कृतीची राख झाली. देवा-देवा, अन हीं आमची कार्टी अजून प्रेम करतात ? त्याना हे चाळे करवतात ? - "

पाहता पाहता म्हाताऱ्याच्या डोळ्यापुढें पुणें शहर प्रकटलें. खुन्या मुरलीधराचे देऊळ, मंडईतील गडबड, शनिवारवाडा, शिवाजीचा पुतळा, आग-आग ! चौफेर प्रचंड ज्वाळा जमू लागल्या. सारी सदाशिव पेठ उध्वस्त झाली. अप्पा बळंवत चौकांतून पाट वाहूं लागले. लुटालूट, खून, बेअब्रू---पुण्यनगरींत एकच प्रलय माजला ! डेक्कन जिमखान्यावरून, कसब्यातून, कॅंपातून नागावलेल्या निर्वासितांच्या रांगा स्टेशनकडे धांवत सुटल्या. मुंबईकडे जाणाऱ्या गाड्या प्रेतांच्या ढिगांनीं भरत होत्या. तळेगांव, लोणावळें, कर्जत, कल्याण- अनेक गांवचे निराश्रित फाटलेल्या उराने सैरा-वैरा चालले होते. मुंबईच्या धक्क्याकडे धांपा टाकीत धांव घेत होते.

ढोलक्याच्या आवाजानें म्हातारा भानावर आला. बाजूच्या मोकळ्या जागेंत एक मराठी पेहेलवान ढोलकें बडवीत होता. पंधरावीस जवान शक्तीचे प्रयोग करून दाखवीत होते. आसनें, उड्या, मलखांबावरची कसरत. सैनिकांची, सिंधी गृहस्थांची खूप गर्दी जमली. ठेंगू, चपळ मराठी मुलांचे शारीरिक प्रयोग पाहून सैनिक टाळ्या वाजवीत होते, सिंधी लोक पैसे टाकीत होते.

'तानाजी तालीम संघ, सातारा'ने थाळी फिरवून पांच सहा रुपायांची कमाई केली. म्होरक्यानें हिशेब ठेवला व इतर जवान सामान आवरून क्यामारीहून निघाले. पुढचा प्रयोग कश्मीर होटेलजवळ करायचा बेत होता. दिवसांतून सात आठ प्रयोग झाले म्हणजे पंधराजणांच्या टोळीच्या

पोटांची सोय होई. आणि त्यांच्यावर अवलंबून असलेल्या अनाथ स्त्रियांची नि बेवारशी बालकांची !

पुढाऱ्याच्या पायतणाचा अंगठा तुटला म्हणून सारें आडरस्त्याला गेले. एका मुलतानी कापडव्यापाऱ्याच्या दुकानाच्या दाराशीं सर्जन साठे वहाणा दुरुस्त करायचें बारकें दुकान मांडून बसले होते. पुढाऱ्यानें वहाणा साठ्यांच्या समोर केल्या व तो पान खाऊं लागला.

टक्कल पडलेलें, सदा हंसतमुख साठे हंसले व म्हणाले, " टाकून द्या ह्या कोंकणी वहाणा. कराचींत चालायच्या नाहींत ह्या ! "

" आपलं तें खरं ! अन् ह्याच्या पत्रावळी झाल्यावर आहेतच इथल्या नाजूक सपाता–" पुढाऱ्यानें तोबरा भरून म्हटलं.

" नाहीं–नाहीं. तोवर मी कोल्हापुरी वहाणांचा कारखाना काढतों, बघा—"

" छे छे, डॉक्टर ! आम्ही पैसे जमवून तुम्हांला हॉस्पिटल काढून देणार—"

सर्जन साठे तोंड भरून हंसले, " चांगला सुटलों आहें तें कां अडकवतां मला ? " त्यांना अधिक चांगलं वाक्य आठवलं. मोठ्यानें हंसून ते म्हणाले, " तुझ्या आंतड्यांना मीच टाके घातले होते. आतां तुझ्या वहाणांना—"

पुढाऱ्याचें पेहेलवानी शरीर शहारलें. आयुष्यांतली कमाई नि नातंगोतं नाहींसं झालं तरी ह्यांचा विनोद जागा होता, जाग्यावर होता. आणि पुढाऱ्याला मलखांबाशीं झटतांना कऱ्हाडहून घरदार सोडून रातोरात केलेलें पलायन स्मरत होतें.

सर्जन साठे म्हणाले, " कशी वाटते कराची ? "

" साताऱ्याची सर दुनियेंत कुठें येणार नाहीं ! हे पोशाखी लोक, हें रुक्ष वातावरण—विटलों अगदीं ! आपलीं घाटावरचीं जंगलं नि डोंगर दऱ्या —"

" मला मुंबईपेक्षां कराची बरी वाटते ! किती स्वच्छ आहे. मुंबईसारखा

धूर नाहीं नि धांवपळ नाहीं—" साठ्यांनीं अंगठा शिवून वहाण टाकली व आणेली उचलली.

सर्जन सांठ्यासारखा हंसरा चेहेरा करीत सातारी पेहेलवान कश्मीर हॉटेलच्या पिछाडीस खेळ करूं लागला.

कश्मीर हॉटेलच्या गच्चीवरच्या प्रशस्त फरशावर खुर्च्या टाकून रेडिओ ऐकत अनेक लोक मद्यपान करीत होते. मुख्य गर्दी मुंबईकर निर्वासितांची होती. सुटाबुटांतलें प्रतिष्ठित लोक, बुशकोट, फ्लॅनेल पँट वापरणारे फिकट तरुण टेबलाटेबलाशीं सिगारेटी ओढीत, बीर पीत बसले होते.

" अगदीं ' चेतना 'मध्यें असल्यासारखं वाटतं—" एक तरुण बीरचा घुटका घेत मोडक्या मराठींत म्हणाला,

" बॉम्बे इज् बॉम्बे–" दुसरा इसम इंग्रजींत उद्गारला. त्याच्या ग्लासमध्यें त्याला अपोलो बंदर, ग्रीन्स हॉटेल, कफ् परेड, महालक्ष्मीचे घोडेमैदान दिसलें.

सिगरेटच्या धुरांत शून्यपणें पहात बसलेला तिसरा उतार वयाचा साहेब उद्गारला, " जुनं जाऊं दे सारं !–इथेंच जगायचं आहे आता आपल्याला. आतां कराची आपली कर्मभूमि–"

" पण आपल्याला खेड्यांत धाडणार म्हणे–"

" तें घाटावरच्या व कोंकणांतल्या लोकांना. वुई आर बॉबाईटस्–" पुन्हां त्या तरुणाला बीरच्या थरांत मुंबई बेट दिसलें.

उतार वयाचा इसम म्हणाला, " आपल्या ॲक्टिव्हिटीज् सुरू केल्या पाहिजेत. टागोर सोसायटी, आर्टस् सेंटर, कल्चरल् कॉंटॅक्ट्स्–आपल्यांतलें कवि, चित्रकार, जर्नालिस्टहि सारे इथें आहेत. आपले पेट्रन्स पण पैशानिशीं आले आहेत—"

" इथल्या मुल्तानी शेठ्यांचा फायनान्स घेऊन फिल्म कंपनी काढायची माझी स्कीम आहे. सुदैवानें आपल्या नट्या नि दिग्दर्शक सुखरूप आले आहेत." एक झिंगलेला माणूस म्हणाला. त्याच्या कर्तृत्वावर विश्वास असल्यानें व सरकारशीं त्याचे संबंध असल्यानें सारें सरसावून ऐकूं लागले.

वेटरनें ग्लास गोळा केले व नव्या इसमाच्या हवाली टेबल केलें. कामाचे तास संपल्यानें तो जायला निघाला. होटेलचा जिना उतरून बसमध्यें बसला.

बसमधल्या गोंधळांत वेटरचें डोकें अधिकच भणाणून गेले. सिगरेटच्या धुरानें व दारूच्या दर्पानें ओकारी आल्यासारखें वाटत होतें. चित्रपट, चित्रकला, मुंबईकर—पुस्तकी पंडितांच्या उच्च समाजाची किळस आली होती. आणि पुन्हा पुन्हां पूर्वायुष्य आठवत होतें! पनवेलच्या घरात काय घडत असेल आतां?—आईसुद्धां आगींत पडलं असेल?—शाळेतलीं कोंवळीं निष्पाप मुलें कुठें असतील? देवदर्शनाला जाणाऱ्या सुवासिनी, भाताची रोपे लावणारे शेतकरी, गवतात हिंडणाऱ्या गाई म्हशी, जागजागचे म्हसोबाचे दगड? कुठे असेल, कसें असेल, कधीं दिसेल?—काय झाले सारे?—यात्रेला निघालेली बायको व मुलगा गाडींतच मारले गेले—कीं पळविले गेले?—नागपूरला सासुरवाडीला लुटालूट झाली असेल, नगरला मावशीच्या मुली पळवल्या असतील,नाशिकला मेव्हण्याची बाग जळली असेल—? काय काय झाले? कुणी जिवंत तरी आहेत का?—मुलाना तलवारीनें चिरले, पण शाळेची इमारत तरी? मुलींच्या वसतिगृहाचा कुंटणखाना बनवला, पण कॉलेजचे ग्रथालय व प्रयोगशाळा तरी? वारकऱ्यांना कोंडून ठार केले पण त्यांचे भजनाचे सूर तरी?—टिळकांचा स्फूर्तिदायक पुतळा, शिवाजीच्या शौर्याचीं स्मारकें? न भंगणारें तुकारामाचे अमर काव्य? अखंड जीवन देणारा ज्ञानेश्वरीचा अमृतसागर?—कीं संपत्तीची लूट होऊन बायकांची बेअब्रू करून व पुरुषाना षंढ बनवून ह्या राजकारणाच्या लहरी खेळानें महाराष्ट्राला कायमचें मारून टाकले?

तेवढ्यांत बसमधले काहीं सिंधी मोठ्यानें बडबडूं लागले,

"ह्या निर्वासितानीं नको केलंय्! आपल्या सुंदर कराचीचा सत्यनाश चालवला आहे-"

"रोग फैलावताहेत! महागाई वाढवत आहेत!"

"कसं झालं तरी आपले भाईबंद आहेत. त्यांच्या दुःखाला आपणहि कारण आहोंत —"

" आपल्यावर पाळी आली असती तर ? जे कदंहि असाँ साँ इएं थिएं हा—"

तो अर्धवट ऐकत होता. बहुतेक द्वेषानें व क्वचित दयाबुद्धीनें पाहात बोलत होते. त्यांच्या डोळ्यांची व बडबडण्याची त्याला चीड आली. पण सारें सहन करणें. मामावृन घेणें भाग होतें. सिंधी भाषा शिकली पाहिजे, इथल आचारविचार आत्मसात केले पाहिजेत ! पनवेलचा परिसर सोडून तो सव्वीस सत्तावीस वर्षांत फारसा कुठं गेला नव्हता. अन आतां ह्या वाळवंटांत कायमचें राहायचें नशिबीं आलें ! ह्या तांदूळावर, ह्या उन्हाळ्यांवर, इथल्या मृगजळावर कसा काळ कंठायचा ? कसे संसार थाटायचे ? काय खायचें, काय उद्योग करायचे ? निर्वासितांच्या छावण्यात कुठवर कुत्र्यासारखे राहायचे ? -कुणाशी नातें जोडायचे ? कसले वंश वाढवायचे ? कसली श्रद्धा, कसली ध्येयें धरायचीं ?

थिएटरशी तो उतरला. स्टापजवळ दाढी वाढवून उभा असलेला पोक्त इसम म्हणाला,

" ए बाळ्-अहो समाजसेवक ! संपली का वेटरची नोकरी ? आतां काय समाजसेवा करणार कां ? बाकी खूप कार्य करायला आहे इथें तुमच्यासाठी—"

" वकीलसाहेब ? इथें काय करता ? "

" झक मारतों ! अरे पहिल्यापासून सागत होतों हें भविष्य आम्ही. ऐकलं नाहींत आमचं. सगळ्यांच वाटोळ केलंत, देशाची चिरफाड केलीत ! बसा बोंबलत आतां ! चागली जिरली-बेट्यांनों चांगली जिरली ! "

वकीलसाहेब विकटपणें हंसत सुटले. उलट्या बाजूने दुसरी बस येतांना दिसल्यावर ते तसेच तिकडे धांवले. बसमधून कोणी मराठी माकड उतरलं कीं त्याच्यापुढें नाक खाजवायला :ते आतुर असत. एखादा केसाळ डोक्याचा तरुण, एखादा खादीधारी इसम, एखादी गोल नेसलेली स्त्री. बरी जिरली, बरी नाकं कापलीं ह्या पुरोगामी धर्मलंड लोकांची !—

केस पिंजारलेलीं अन खादी पेहेरलेलीं तीनचार माणसें वळणावरच्या चिंचोळ्या पुस्तकाच्या छोट्या दुकानांत बसलीं होतीं. गोल नेसलेली

एक स्त्रीहि त्यांत होती. वर जाणाऱ्या जिन्याच्या खालीं दुकान सजवलें होतें. पेंग्वीनची, शाळा कॉलेजचीं पुस्तकें, सिनेमाचीं मासिकें व रोजचीं वर्तमानपत्रें विक्रीसाठीं ठेवलीं होतीं. निर्वासित मंडळातर्फे मराठींत सुरू झालेलें साप्ताहिक प्रामुख्यानें लावलें होतें. सिंध सरकारला निर्वासितांचा खलिता, तंडो आदमला असलेल्या छावणींतल्या भयानक हालाच्या बातम्या, एक्स्टेंन्शवर बंगल्यांत राहाणाऱ्या गुजराती निर्वासितांना निर्वाणीची हांक, मुंबईहून व जोधपुराहून येणाऱ्या लोकांची माहिती, इत्यादि मजकुराची दाटी पानापानांत झाली होती.

केस पिंजारलेल्या एक काटकिळा इसम म्हणाला, " तो पहा, तो साग-लीचा वकील. वेड्यासारखा बडबडत हिंडतो आहे. ह्या दुर्दशेमुळे खूष आहे. त्याच्या मतांचा विजय झाला म्हणून ! "

"तो धर्मवीर ना ! त्यानंच मुंबईहून निघालेल्या पडावांत फक्त ब्राह्मणांना भरायचा यत्न केला—"

" जाऊं दे रे-" तेथली रुक्ष चेहेऱ्याची बाई उद्गारली. " तेवढा कडवटपणा आपणहि दाखवायचा काय, हा प्रश्न आहे. दुर्दैवानें त्याचं म्हणणं खरं झालं आहे-"

तो इसम उसळला, " म्हणजे त्याचीं मतं बरोबर आहेत की काय ?- तूंहि असं म्हणायला लागलीस ? बाकी आपल्यांतले कित्येक विचारवंत महा-राष्ट्रीय पुढारी नि लेखक जिथं गर्भगळित झाले आहेत, प्रतिगामी मतांना अगतिकपणें कवटाळीत आहेत—"

" भाडूं नका रे-" पोक्त पेपरविक्रेता म्हणाला, " हीं भाडणं आधीं आटपा. महाराष्ट्रांत मालक होतात तेव्हां भांडलांत, इथें भिकारी आहात तरी भांडणं चालूच ! ब्राह्मण अब्राह्मण, मुंबई आमची कीं तुमची, कला कीं नीति, समाजसेवा की राजकारण, सकच्छ की विकच्छ, टिळक की गांधी-वाद, वाद, वाद नुसतें ! इथें तेंच. महारांना आमच्या कँपमध्यें नको. मास्तरच्या नौकऱ्या ब्राह्मणांना द्या, डागळलेल्या बायकांना परत मुंबई-पुण्याला पाठवा, सक्करला सिंध प्रांत तोडून मराठ्यांसाठीं राज्य स्थापन करा. अरे, आणिक कुठल्या नरकांत जाणार आहांत अखेर ?—"

एक चुणचुणीत मुलगा एका लहान मुलीचें बोट धरून उड्या मारीत दुकानात आला आणि सारेंच बोलणें राहिलें. तो मुलगा चड्डीच्या खिशांतून बरीचशीं नाणीं काढून टेबलावर ठेवीत म्हणाला,

" सत्तावीस अंक विकले. ह्या सत्तावीस चवल्या !–कियामारीपासून एरोड्रोमपर्यंत हिंडलों. अन बाई, तुम्ही दिलेलीं पत्रकंहि वाटलीं—"

" शाबास ! " बाई कौतुकानें म्हणाली. परळच्या गिरणीकामगाराचा तो एकटाच राहिलेला मुलगा तिच्याच बोटींतून कराचीला आला होता. " अन ही मैत्रीण कोण आणलीस ? "

" ही घाटावरची आहे. कुठल्याशा सरदाराची मुलगी. छान गोष्टी सांगते. तिची छोटीशी मोटार होती, सायकल होती, पलंग होता ! छावणींत ओळख झाली—तिला भेळ खायची आहे म्हणून घेऊन चाललोंय् ',

इदगा मैदानावर जागजागीं भेळेचीं दुकानें मांडून मराठी निर्वासित विक्री करीत होते. धोतराचा काचा मारलेले, गळ्यात गंडे घातलेले, शेंडी पिंजारलेले. अनेक तऱ्हेचे व जातीचे पुरुष पुरीपकोडी, पाणीपुरी, ओली-सुकी भेळ बनवीत होते. पदर खोंचलेल्या, आंबाडे बांधलेल्या,चोळ्या घातलेल्या बायका मदत करीत होत्या. साऱ्याचे चेहेरे फाटलेले नि शरीरें सुकलेलीं दिसत होतीं. पण मन लावून ते काम करीत होते. डोळ्यांत प्राण आणून गिऱ्हाईकं हेरत होते. चिवटपणें धंदा वाढवीत होते. ' अहो मलकानी अहो झांगियानी, हे दाह अचो सॉई;...अहो बाईसाहेब, माताजी, घट में घट सैम्पुल त खा;...अहो सिंधीसाहेब, मृते महरबानी कर— !' कुणाची मुंबईची भेळ, कुणाचा नाशिकचा चिवडा. कुणाची मिसळ, पापड, भजीं ! सेवासदन संस्थेनें तेवढ्यांत लोणच्या मोरंब्यांचा स्टॉलहि काढला होता. आणि मैदानावर बसत बागडत आनंदित सिंधी कुटुंबं भेळ खात होतीं. लहान मुलं रेशमी नि रंगीत कपडे घालून धांवत होतीं,ओरडत होतीं. जॉर्जेट सिल्कच्या भारी साड्या ल्यायलेल्या, सुंदर कर्णभूषणें नि विपुल कंकणें घातलेल्या सिंधी शकुंतला नि उंची सूट वापरणारे, नाजूक व साजूक सिंधी कन्हैये हातांत हात घालून विहार करीत होते. दिमाखदार मोटारींतून धनाढ्य कुटुंबें जात येत होतीं. निष्पापतेचें, तरुणाचें, वैभवाचें व अक्षय्य सुखाचें

प्रदर्शन उघडलें होतें जणूं !–अन् मधून मधून मुर्दाड चेहेऱ्याचीं मराठी माणसें लाचारीनें त्यांना विटाळत होतीं, विक्री करून जगूं पाहत होतीं.

एकाएकीं एका कोपऱ्यांत कसलीशी दंगल झाली. सर्व गडबडून गेले. भेळवाल्यांनीं आपलीं दुकाने आवरलीं. सिंधी लोकांनीं आपल्या बायका-मुलांना सांवरलें. कोपऱ्यांत गर्दी वाढूं लागली. लाठ्या झडूं लागल्या, डोकीं फुटूं लागलीं. आरडाओरडा वाढला. माणसें सैराट पळूं लागलीं... अखेर पोलीसपार्टी आली नि पुन्हां सावकाशीनें शांत झालें. परवां निर्वासितांच्या दोन गटांत अशीच मारामारी झाली. काल निर्वासितात व सरकारी अधिकाऱ्यांत झगडा झाला. आजचा सामना बनारसी भैय्यांबरोबर होता. मराठे आल्यापासून उत्तर हिंदुस्थानी लोकांच्या पोटांवर पाय आला होता. स्वैपाक करायला, भांडीं घासायला, गस्त घालायला मराठी बाया व बुवे सिंधी लोक पसंत करीत.मोठे स्वच्छ,प्रामाणिक व कष्टाळू असत म्हणून.अन मग बिहारी व बनारसी मोलकरी व मजुरांचा भडका होत होता.

जखमी लोकांना गांधी मैदानामागच्या छावणींत नेलें. मराठी मंडळाचें शुश्रूषा-पथक आलें. तत्परतेनें सेवा सुरू झाली. पुढील लढ्याचा कट शिजूं लागला.

छावणीभर गोंधळ माजलेला होता. जागजागी तेलाचे दिवे आग ओकीत होते. चुली पेटल्या होत्या, चिलमी पेटल्या होत्या. पाण्याचे ओंगळ ओहोळ जागजागीं वाहात होते. जेमतेम उभ्या केलेल्या झोपड्या भयानक सांवल्या धरीत होत्या. कुणी बडबडत होते. न बोलणाऱ्या लोकांचे चेहेरे तर अधिक शहारे आणीत होते. नुसता नरक साकार झाला होता !

‘ कशी ही गव्हाची रोटी खायची ?—सोलापूरसारखा जोंधळा मिळणार नाहींच ?—हगवण लागली माझ्या चारी पोरांना ! ’ एक बाई कपाळावर हात मारून म्हणाली. तिची शेजारीण भकास हंसली, ‘ सुटलें मी ! मुंबईला माझीं सारीं पोरं चांडाळांनीं चवथ्या मजल्यावरून फेकून मारलीं!’ कुठल्या तरी झोपडींत चोर शिरला होता व त्याला लोक धरून ठेवत होते. ‘ चांगलें इनामदार होतांत, अन् आतां दुसऱ्याचं घड्याळ चोरतां ?—’ लोकांच्या प्रश्नाला तो हंसत होता व हात हिसकत होता. पाणवठ्यावर एक

मराठण पदर डोकीवरून घेत म्हणत होती, ‘ ए म्हारणी, दूर हो–माझ्या कळशीला शिवलीस ! ’ झाडाखालीं बसून एक टक्कल पडलेला पांढरपेशा हुंदके देत पुटपुटत होता, ‘ माझा बंगला–माझा सुंदर बंगला—’ आणि स्वत:भोंवतीं फिरत एक उघडा म्हातारा तुकारामाचें अभंग खडया सुरांत म्हणत होता. कामावर गेलेल्या मुली अजून परतल्या नाहींत म्हणून एक पोक्त बाई कावरीबावरी झाली होती; व मुली ह्या वेळेला मुंबईच्या वेश्या-वस्तींत असतील ह्या विचारानें दुसरी एक वेडीपिशी झाली होती. कुणी खालीं मान घालून होते, कुणी आकाशाकड पाहात होते. कुणाची हालचाल, हातवारें कांहींच बोध देत नव्हते. बेळगांवचीं, कोल्हापूरचीं, सांगलीचीं, सोलापूरचीं, नगरचीं, नाशिकचीं, पुण्याचीं, पनवेलचीं, मुंबईचीं, बडोद्याचीं, जगलेलीं उरलेलीं माणसें मढीं होऊन इथें वावरत होतीं.

‘ स्टेशनवर नवी गाडी आली आहे–निर्वासितांना घेऊन–’ पोटांत फिरणाऱ्या सुऱ्याच्या पात्यासारखी कुणी बातमी आणली. कुणाच्या मनांत धस्स झालें. आतां इथें भरती होणार नि आपले हाल अधिक वाढणार ! कुणाच्या मनांत काहूर माजलें. आपलं कुणी आलंय् कां ?–बाप, बायको, एखादं ओळखीचं प्रेत ?

—स्टेशनाभोंवती परळचे निर्वासित भरले होतेच. तिथेंहि उकीरडा पसरला होता. आणि फलाटावर नवे, खानदेशचे निर्वासित उतरत होते !

स्टेशनाबाहेरच्या गर्दीत चार वर्षांचा एक सांवळा घाटी छोकरा आपल्या म्हाताऱ्या आजीचे ओंचे ओढीत फलाटाकडे धांव घेत होता. आजी त्याला सांवरत होती, समजावीत होती, “ तुला उंटाची गाडी दाखवतें, खारें पिस्ते देतें. ” पण मुलाला कसलेंच लोभन नव्हतें. त्याला आगगाडी दिसत होती, इंजिन दिसत होतें. इंजिनातून आकाशांत दूरवर जाणारा धूर दिसत होता. आजीला ओढीत तो ओरडत होता, “ मला उंटाची गाडी नको, बैलगाडी पाहिजे. आपल्या वडगांवची ढवळ्यापवळ्याची बैलगाडी पाहिजे ! मला इथें राहायचं नाहीं. ह्या आगगाडींतून जायचंय्. आपल्या घराला जायचंय्. चल, आपल्या घरीं चल ! दंगा असला नि कुणी मारलं तरी चालेल; पण आधीं घरीं चल. घरीं... ”

★ ★ ★

# लेकुरवाळा

संध्याकाळचे सहा वाजतांच कचेरींतल्या साऱ्या कारकुनांनीं सुटकेचे सुस्कारे सोडले. अगदीं हेडक्लार्कपासून कालपरवां लागलेल्या कोंवळ्या कारकुनापर्यंत. आठ तास त्या कोंडवाड्यांत डांबल्यामुळें सगळेजण उबून गेले होते. मोडलेल्या मानावर घाम साचला होता व दुखणाऱ्या बोटांवर शाई सांचली होती. कागदपत्रांत अडकलेलें मन मोकळ्या हवेत, मायेच्या माणसात मिसळायला ओढ घेत होतें. हेडक्लार्कनें अंगवस्त्र ठेवलें होतें, त्याच्या आठवणीनें ते आतुरतेनें उपरणे सावरीत होते. तात्पुरत्या लागलेल्या ताज्या कारकुनानें उद्यापासून नोकरीवर यायचें नाहीं असा अखेरचा निर्धार केला होता. इतरांना ऑफिसबाहेर अनेक प्रलोभनें होतीं. कुणाला क्लबांत पत्ते कुटायला जायचें होतें; कुणाला दारांत वाट पहाणारी पत्नीची मूर्ति दिसत होती. कुणाकुणाला गरम चहाचा कप, नातवाचे बोबडें बोल, टेकडीवरील एकांत, सभाकीर्तनाचा रंग, मित्राच्या गप्पांचा अड्डा, स्वस्थपणें सोडलेला सिगारेटचा धूर, वाचनालय, प्रेयसी...

मरगळलेल्या माणसांच्या त्या महापुरातून बापू एखाद्या बुडबुड्यासारखा बाहेर आला. कांहींसा नाइलाजानें, निरिच्छेनें! साहेबाच्या खोलीपासून त्याचें टेबल दूर होतें आणि खिडकीशीं होतें. निमूटपणें तो काम करीत राही. खिडकींतून वारा येई, रस्त्यावरची रहदारी दिसे. टेबलासमोर तोंडें वेडींवाकडीं करणारा म्हातारा अकौंटंट व गोड तोंडाची टायपिस्ट छोकरी बसत असे. वेळ वाईट जात नसे. कष्ट, कटकट होतींच; पण ही आठ तासांची आंकडेमोडी परवडत असे घरच्या डोकेंफोडीपेक्षां!

बापू कचेरीबाहेर आला व कुंजाशीं थबकला. कारकुनांचें कळप वाळूच्या वाटेवरून बागेबाहेर, फाटकाबाहेर जात होते. इमारत ओस पडली, आणि आता बागेंतहि कुणी उरलें नाहीं. बापूनें बागेंत दृष्टि फिरवली. ऑफिसभोंवतीं इतका सुंदर बगीचा आहे, हें त्याच्या हल्लींच ध्यानांत आलें होतें. पूर्वीं सहा वाजले कीं खुर्चीतून उडी घ्यायची ती फाटकाबाहेर, एवढेंच त्याला

ठाऊक होतें. प्रथम मित्रांची ओढ असे व नंतर बायकोचें वेड होतें. मित्रांच्या समवेत ह्या बागेंत बसून त्यानें अनेकदां भेळ खाल्ली होती. आणि इथलीच गुलाबाचीं नि निशिगंधाचीं फुलें खुडून त्यानें मार्गप्रतीक्षा करणाऱ्या पत्नीला नजरही केलीं होतीं. पण बागेच्या सौंदर्यानें तो पूर्वी कधीं खिळला नव्हता. तेथल्या स्वच्छतेचें, सुवासिकतेचें, शांततेचें अस्तित्वहि त्याला आजवर जाणवलें नव्हतें. आतां इथेंच पुष्करिणीशीं बसावेसें वाटत होतें. फुलांच्या ताटव्यांतून फिरावेसें वाटत होतें. दुसरा दिवस उजाडून कचेरीची वेळ होईपर्यंत कळीकळींतला मध प्यावा व पानापानावरच्या शिरा मोजाव्या असें वाटत होतें.

पण सारा देखावा दुरूनच पाहून बापू बगीचाबाहेर आला. तेथल्या सौंदर्याचा आस्वाद घेण्याइतकी शक्ती त्याच्या ठिकाणीं उरली नव्हती. आणि घरच्या गोठ्यात निमूटपणें जाणें कर्तव्यच होतें. वाळूवरून संथपणें ढकलत व फुलांवरून रेंगाळत पहात तो रस्त्यावर आला. ढकलत घराकडें निघाला. रस्त्यानें दिसणारीं अनेक दृश्यें त्याच्या मोडकळलेल्या मनाला भगदाडें पाडीत होतीं. हमरस्त्यानें वेगाने जाणारी मोटरसायकल आणि तिच्यावरचें जोडपें, भव्य बंगल्यांत एकटा रहणारा वृद्ध इसम, पेटीच्या क्लासमधून येणारें आलाप...

बापू बिऱ्हाडाशीं पोंचला तेव्हां घरांत गोंगाट चालू होता. आरडाओरड, रडारड, धपाटे व धडपडाट. बापू दचकून भानावर आला व भडकून गेला. उंबरठ्यावर आडवें ठेवून आपल्या अंगाचें खाटकाच्या सुऱ्यानें कुणी बारके बारके काप करीत आहे, कुणीतरी आपल्या सर्वांगाला शेंबूड फांशीत आहे, असें त्याला वाटलें. त्याच्या अंगावर शहारे आले. तो तिरमिरीनें घरांत घुसला. मारामारी करणाऱ्या, जमिनीवर लोळणाऱ्या, कपडे चिवडणाऱ्या व भोकांड पसरणाऱ्या पोरट्यांच्या पाठींत गुद्दे मारीत सुटला. सात वर्षांची अक्का, पांच वर्षांचा सुधीर, चार वर्षांचा सुरेश व दोन वर्षांचा सुशीलकुमार. कारट्यांनीं घर डोक्यावर घेतलें होतें. जिकडेतिकडे केर केला होता. जमिनीवरच्या जाजमाचा गोळा केला होता. टेबलावरच्या कागदाचे बोळे बनवले होते. खुर्ची उलटी केली होती. तसबीर फोडली

होती आणि बाहेरून आणलेले फरशीचे, सिग्रेटच्या पेटयांचे, जुन्या जाहिरातींचे तुकडे खोलींत सर्वत्र विखुरले होते. आपल्या संसाराचा हा उकिरडा पाहून बापू हताश झाला. पोरटयांचा ओरडा आटोपला, पण त्याचें मन आक्रोश करूं लागलें. पुन्हां त्याला रस्त्यावर ऐकूं आलेले पेटीचें आलाप आठवलें, मोठया बंगल्यांतला वृद्ध इसम दिसला, मोटारसायकलवरचें जोडपें डोक्यांत घोळूं लागलें.

आंतघरांतून लगबगीनें बायको बाहेर आली. धांपा टाकीत ती म्हणाली,

" इश्श ! केव्हां आलात ? ह्या कार्ट्यांच्या कोडाळ्यांत कळलंही नाहीं मला.—"

हीच ती एके काळीं प्रेमपत्रें लिहिणारी पोरगी, दारांत वाट बघत रहाणारी पत्नी !—आतां गाल बसलेली व शरीर सुटलेली पांच पोरांची आई. आपल्या अर्धांगीचा अवतार पाहून बापू उन्मळून गेला. त्याला वाटलें, त्याला वाटलें...

तेवढ्यांत तिच्या कडेवरची बेबी इवल्याशा मुठी पुढे करीत म्हणाली, " बा–बा– "

बेबीची लुडबुड पहातांच बापूचें अवसान ओघळून गेले. त्या दहा महिन्याच्या मांसाच्या गोळ्याकडे तो भकासपणें पाहूं लागला. बेबी कडेवर उड्या मारीत होती, बोलूं पहात होती. वडिलांना ' बा–बा ' म्हणून साद देत होती. नुकताच शिकलेला दुसरा तिसरा शब्द ! बापू सारं विसरला व वात्सल्यानें भरून गेला. ' बा–बा--! लबाड कुठची !–' तो म्हणाला व तिच्या मुठींत आपलें बोट अडकवूं लागला. त्याला ती हांक मारीत होती, त्याच्याकडे ती झेंप घेत होती. बापूनें तिला बायकोच्या कडेवरून घेतलें व खांद्यावर टाकलें.

बायको चहा करायला आंत गेली आणि बापू बाहेरच्या खोलींत फेऱ्या घालूं लागला. अक्का खोलींतला केर खालच्या मानेनें आंवरीत होती. तशी ती शांत, आणि गरीब मुलगी होती. आईला मदत करीत असे. भावंडांना खेळवीत असे. ती गाणींहि चांगलें म्हणे. बेबीला थोपटत बापू अक्काच्या

आकृतीकडें आपलेपणानें पाहूं लागला. कोंपऱ्यांत तोंडांत आंगठा घालून सुशीलकुमार उभा होता. बेबीमुळें बिचाऱ्याकडें दुर्लक्ष होत होतें. पण बेटा मोठा गुंड होता. अन् वडिलांना भिऊन बाहेर सटकलेले सुधीर व सुरेशहि कांहीं कमी नव्हते!—बापू अभिमानानें भरून गेला. आपण पोरांचा तिटकारा करतों आणि स्वतःच्या कर्माला दोष देतों ह्याची त्याला शरम वाटली. दोन बायका करूनहि मूल नाहीं म्हणून हेडक्लार्क उदास असतो, हें बापूला आठवलें. आणि त्याला स्वतःबद्दल समाधान वाटलें.

चहाचा कप घेऊन बायको बाहेर आली. पदर मोकळा करीत ती म्हणाली, "घ्या—"

बापू हात पुढें करणार तेवढ्यांत बेबीनें धडपड केली. तिच्या हातानें कप कलंडला. सगळा चहा बापूच्या कपड्यांवर सांडला. कढत कढत थेंब त्याच्या हातांवर, मांडीवर उडाले व त्यानें बेबीला धाडकन् जमिनीवर ठेवलें. बेबी केकाटूं लागलेली पाहून त्याचें कपाळ आंठ्यांनीं भरलें. धोतरावरचे, सदऱ्याकोटावरचे ओले डाग तो पिळूं लागला. बायको कप दूर ठेवून जवळ आली तशी तो अधिकच भडकला, "दूर हो ग तूं! मधे लुडबुडूं नको!" तो खेकसत म्हणाला. अन मग दूर उभ्या असलेल्या अक्कावर ओरडला, "बघतेस काय? बेबी बोंबलते आहे, तिला उचल कीं जरा!—"

बायकोनें बेबीला पाळण्यात दामटून निजवलें व अक्का कपबशी घेऊन आंत गेली, तरी बापूचा राग शांत झाला नाहीं. त्याला चहा मिळाला नव्हता. ऑफीसमधून आल्यापासून त्यानें कपडेसुद्धां काढले नव्हते. आंतून घाम सांचला होता नि बाहेरून चहा सांडला होता. आज पांच वर्षे त्याचे कपडे असे खराब होत होते. त्याचे आजवर एकूणएक कपडे चहानें चिंब झालेले नि मुतानें माखलेले होते. काय ही घाण! काय हा जांच!–जो बापू टापटीप, स्वच्छता, सुबकता ह्यांना अति जपत असे, त्याला उकिरड्यांत, गटारांत जगावें लागत होतें...

बापूनें कोट काढला, धोतर सद्रा बदलला, पण त्याला बरें वाटेना. आतां त्याचा डावा हातही दुखूं लागला, वळूं लागला. सकाळसंध्याकाळ

मुळें घेऊन त्याच्या हाताचे स्नायू हळवे झाले होते. कोपराशीं त्याचा हात आपोआपच दुमडूं लागे.—कुठल्याशा सिनेमांत चार्ली चापलीनचीं बोटें बोल्ट फिरवून वळत, तसा आपला दुमडणारा दुखणारा हात दुसऱ्या हातानें दाबीत तो उदासपणीं खुर्चीवर बसला.

बायकोनें पुन्हां चहा आणून दिला, चांचरत ती चार शब्द बोलली, पण बापू आपल्याच नादांत होता. कसाबसा त्यानें चहा घेतला, कशींबशीं त्यानें उत्तरें दिलीं व तो विचार करीत राहिला. ह्या लेंढारामुळें उध्वस्त झालेलें आयुष्य कसें सांवरावें हें त्याला समजत नव्हतें. त्याच्या साहेबाला नि पट्टे-वाल्यालाही अशींच ढीगभर पोरें होतीं. पण साहेबाच्या घरीं आया होतीं, बाल्या होता. साहेब नुसता मुलांना बोट न लावतां ' टा–टा ' करीत असे. अन् पट्टेवाल्याला पोरांची आठवणही नसे. तो घरीं जाई तेव्हां पोरें झोंप-लेलीं असत अगर रस्त्यावर खेळत तरी असत. बापूच मुलाबाळांच्या गुंताव-ळ्यांत अडकला होता.

वरच्या फळीवर रद्दींत पडलेल्या मुलांच्या मानसशास्त्राच्या पुस्तकाकडें बापूनें निराशेनें पाहिलें; व मग तो खोलीभर असलेलीं दुपटीं, गलोतीं, लंगोट, झबलीं, बाहुल्या, मातीचीं चित्रें अन् अशाच अनेक गोष्टी पाहूं लागला. खडूने भिंती चौफेर चितारल्या होत्या वरती दांड्यावरून कपडे टाकले होते व खालीं जाजमावर खेळ पसरला होता. आणि कोपऱ्यांत पाळणा झुलत होता. पाळणा !– आज पाच वर्षें तो हालत होता. त्याची गती थांबत नव्हती. ती जणूं कधींच थांबणार नव्हती ! बापू दचकला. त्याला उगाचच वाटलें कीं बायकोला पुन्हा दिवस गेले आहेत. तो घाम फुटून उठला. घाईनें पाळणा थांबवून घरांत गेला. बायकोकडें पाहूं लागला.

" असं काय बघता ?–कांहीं हवंय् का ? " भांडीं विसळतांना ती म्हणाली. तो भानावर आला, पण त्याच्या मनांतली भीति गेली नाहीं. बायकोकडे विचित्रपणें पहात तो म्हणाला,

" मला एकदम वाटलं...बेबीच्या मागोमाग...तसं नाहीं ना कांहीं ! "

"इश्श !" बायको हंसली, रागावली, पुन्हा हंसली. "वेड कां लागलंय् ?

...मी तर अगदीं विटून गेल्यें बाई ! तुम्हांलाच हौस आहे. परवां अष्टपुत्रा म्हणून आशीर्वाद..."

बापू तिथून निघून गेला. त्याला जरा सुटल्यासारखें वाटलें. पण त्याचें मन खुलून आलें नाहीं. त्यालाच हौस होती म्हणे ! ती अष्टपुत्रा होण्या-आधींच तो अष्टावक्र झाला होता. त्याला आपल्या बायकोची चीड आली. ती आपला उपहास करते आहे, आपल्यावर सूड उगवते आहे, असें त्याला वाटलें. कोट-टोपी उचलीत तो ओरडला,

" मी जरा जाऊन येतों ग. "

बायको धावतच आली. म्हणाली, " लवकर या ! सुकुमार जेवत नाहीं तुमच्याशिवाय. तुमची वाट पाहून, पेंगळून तसाच उपाशी झोपतो. अन् बेबीचं औषध आणायचंय् ना आज ? "

बायकोनें पुढे केलेली बाटली पहातांच बापूचें तोंड एरंडेल प्यायल्या-सारखें झालें. मुलांच्या पायीं त्याचा पत्यांचा नाद नि फिरण्याचा व्यायाम केव्हांच संपला होता. पण घरांतून चार पावलेंही दूर व्हायची सोय राहिली नव्हती. मुकाट्यानें त्यानें बाटली पकडली व खिशात ठेवली. खिशांतला सुकुमारच्या शेंबडाचा रुमाल दूर टाकला.

दारांत उभें राहून सुधीरनें म्हटलें, " बाबा, मी येऊं ?—"

सुधीरचा लाचार स्वर पाहून बापूला घोटाळल्यासारखें झालें. तो त्रासि-कपणें म्हणाला, " हं. चला ! पण तोंड साफ करून या—"

सुधीर नि त्याच्या मागोमाग सुरेश पाण्याशीं खेळूं लागले, तोंपर्यंत बापू दारांत उभा राहून रस्त्यावरून फिरणारे सडे पुरुष पहात होता.

सुकुमारला रडत ठेऊन, सुधीर व सुरेश बापाचा एकएक हात पकडून निघाले. सुकुमारचें रडे ऐकून बापूला वाटलें, कीं त्यालाही घ्यावें. पण तीन पोरें बाजारांतून नेणें त्याच्या आजोबांनाही जमलें नसतें. सगळ्यांनाच घरीं ठेवायची आतां सोय उरली नव्हती. बापू तसाच निघाला. घराबाहेर आल्या-वर पोरांना माराचा धाक उरला नव्हता. सुधीर सारखे प्रश्न विचारीत होता.- " हें काय आहे, त्याला काय म्हणतात, तें कशाला असतं " असें

विश्वव्यापी, उत्तर नसलेले प्रश्न आणि सुरेश दुकानांतून दिसणाऱ्या खेळण्यांची व खाऊंची अखंडपणें मागणी करीत होता.

वाटेंत कुणा ओळखीच्या इसमाला नमस्कार करीत, कुणा स्नेह्याशीं चार शब्द बोलत, बापू चालला होता. त्याला सारखें वाटत होतें, कीं लोक आपल्याला हंसत आहेत. एवढा तरुण माणूस, पण पोरांचं लेंढार मागें लागून अर्धमेला झाला आहे.—काय हो, कॅलेंडर कितवं? कुणी गच्चीवरून विचारलं.—एकजण समोरूनच ओरडला, खांद्यावर बंदूक नाहीं आज?—एक मित्र कानांत म्हणाला, आतां आंवरा कीं!—आणि एक अनोळखी तरुणी तिटकाऱ्यानें पहात निघून गेली.—बापूला वाटत होतें. मुलें 'बाबा–बाबा' चें पालुपद धरून बोलत होतीं त्याची त्याला लाज वाटत होती. हीं कुणा नातलगाचीं, परक्याचीं पोरें कुठें पोंचवत आहों, असा आविर्भाव आणावासा वाटत होता.

तेवढ्यांत समोरून सायकल आली अन दचकून बापूनें दोन्ही मुलांना अंगाशीं ओढलें. त्यांना सांवरीत सांभाळीत तो बाजूला झाला.

दवाखान्यातल्या दाटींत दोन्ही पोरें बापूला बिलगून बसलीं होतीं. बागुलबुवाइतकीच त्यांना डॉक्टरची दहशत होती. आणि बापू नेकीनें वागत होता, कर्ज करीत नव्हता, तरी सावकाराची सावलीही कशी भयानक असते याचा त्याला अंदाज आला होता. डॉक्टरचीं बिलें संपत नव्हतीं, दवाखान्याच्या फेऱ्या संपत नव्हत्या. आणि डॉक्टरचा उपदेशही संपत नव्हता. अनेक तऱ्हांनीं डॉक्टरनें उपदेश केला होता, आणि तऱ्हतऱ्हेचीं औषधें दिलीं होतीं. पण बापूचें दुर्दैव दर पाळीस वाढत होतें, डॉक्टरचे पेशंट वाढत होते.

क्षयी माणसाच्या मुद्रेनें बापू दवाखान्यांतून परतला. मुलें पुन्हा उल्हासित झालीं. उड्या मारीत होतीं. पण बापूला दवाखान्याचें वातावरण विसरतां येत नव्हतें. शिष्ट डॉक्टर, अति शिष्ट कंपौंडर. बाटल्यांच्या रांगा, आजाऱ्यांच्या रांगा...हळूहळू त्याला सूतिकागृहांतल्या पाळण्यांच्या रांगा दिसूं लागल्या. पाळणे हालत होते, भरत होते. कपड्यांत लपेटलेलीं बाळं,

लांब बाह्यांचीं पोलकीं घातलेल्या बाळंतिणी, बाहेर तिष्ठत राहिलेले अनेक बाप्ये, अनेक बापू...बापूला वेड्यासारखें झालें. तो कसाबसा घरीं आला. जणूं आणखी एक मूल घेऊन तो घरीं येत होता.

खोलीच्या कोपऱ्यांतून पाळणा टाहो फोडत होता. बापू थरथरला. प्रसूतिगृहांतले सारे पाळणे कैंकाटत सुटले. दोन्ही पोरांनीं धरलेले हात सोडवून घेऊन बापूनें तळव्यांनीं डोकें दाबून धरलें. पाळणा शांत झाला. किलबिल्या नेत्रांनी बापूनें पाहिलें. पायपेटींतून अनेक सूर आतां उठूं लागले. त्या पाळण्याच्या जागी पूर्वीं पायपेटी ठेवलेली असे. बापूचें आवडतें वाद्य, एकुलता एक विसावा. पण वाढत्या संसारासाठीं पायपेटी विकावी लागली. व त्या जागीं पाळणा आणला गेला. कांहीं दिवस भाड्यानें आणलेला पाळणा अखेर विकत घेऊन तेथें कायमचा ठेवला गेला. त्या पाळण्यांतल्या पोरांनीं बापूचें संगीतप्रेम नाहींसें करून टाकलें. एकांतांत, अंधारांत त्याला परत परत पायपेटीची आठवण येई. पायपेटींतून उठलेले असंख्य स्वरसमूह बापूला आजही ऐकूं आले. आणि मग त्या दिशेकडून, त्या स्वरांतून, हळूहळू पण अखंडपणें येणारी असंख्य,अनोळखी अर्भकांची अंधुक रांग दिसूं लागली....

बापू बिऱ्हाडाबाहेर आला. डोकें दाबीत, तोल सांवरीत ! घरांत वळवळणारी पांच आणि त्यांचा पाठलाग करीत येणारीं परार्ध पोरें त्याच्या हृदयाचे अणूअणूंएवढे तुकडे करीत होती. त्याच्या आयुष्यांतलें संगीत, स्वच्छता, स्वास्थ्य, स्वातंत्र्य सारें पुरून टाकीत होती.बापूला वाटलें, असेंच पळून जावें. ह्या घरांतून ह्या बायकापोरापासून दूर कुठेंतरी एकांतांत, अज्ञातवासांत उरलेलें आयुष्य काढावें.

पण तो तसाच उभा राहिला. पळून जाणें जमलें असतें तर तें पूर्वींच जमलें असतें. बेबीचा जन्म न व्हावा म्हणून योजना करणें ज्याला जमलें नाहीं त्याला आतां पळण्याची शक्ति येणें शक्य नव्हतें. सुकुमारच्या आजारांत अहोरात्र जागणारा, सुधीरसाठीं पायपेटी विकून पाळणा आणणारा, सुरेशसाठीं नोकरी न जावी म्हणून साहेबाचे शब्दशः पाय धरणारा

व पहिल्या अपत्याचे जन्मवेळीं काळजीच्या जळवा लावून घेणारा बापू पंख कापलेल्या पांखरासारखा सारखा उंबरठयाआड अडकून पडला होता.

समोरच्या बिऱ्हाडांतलें जोडपें हंसतखेळत फिरून परतलेलें पहातांच बापू असूयेनें भरून गेला. आज पांच वर्षें त्यांनीं निसर्गावर मात केली होती. राजा राणी टुमदार संसारांत रमलीं होतीं. फिरायला जात, सिनेमाला जात, हॉटेलांत जात,मजा करीत. बापू विषादानें भारला व घरांत वळाला.

" हॅलो ! बाप्या ! " त्रिंबकनें मागून पाठीवर थाप मारली. बापूनें चेहरा वळवला. आपल्या बालमित्राला पाहून बापू एकदम खुलला. " ये रे त्रिंबक ! किती दिवसांनीं येतो आहेस ! " तो म्हणाला व त्यानें त्रिंबकपुढें खुर्ची सरकवली. आणि स्वत: टेबलाच्या टोंकाला बसून म्हणाला, " बोल ! "

त्रिंबकनें खोलीभर नजर टाकली. बापूला वाटलें, आतां मुलाबाळांवरून हा आपली थट्टा करणार. आणि बायको तर पाळण्याशींच बेबीला पाजीत बसलेली ! मित्राच्या देखत चक्क पाजीत होती ! बापूचें मन पुन्हां करपून गेलें. त्रिंबकची नजर चुकवीत व त्याची नजर बायकोकडे जाते कीं काय हें निरखीत तो हात चोळीत बसला.

त्रिंबक आपल्याच नादांत मजेंत बसला होता. खुर्चीच्या हातावरच्या झबल्याशीं खेळत तो बडबडत होता. क्रिकेटच्या आगामी सामन्याबद्दल सांगत होता. मध्येंच तो म्हणाला,

" मग येणार आहेस का मॅचला ?–काढूं तिकिट तुझं ? "

" ऑ–ऑं–कसली मॅच ?–नको रे बुवा ! " बापू कसाबसा म्हणाला. आपण कधींकाळीं क्रिकेट खेळत होतों हें तो आतां विसरलाहि होता.आणि मॅचला जायला पैसे कुठें होते ?

त्रिंबक म्हणाला, " अगदींच लेका तू म्हातारा झाला आहेस ! वहिनी, तुम्ही त्रास देतां वाटतं फार ह्याला ? "

" इश्श ! मी तर ह्यांना म्हणतें, कीं जावं चांगलं मॅचला, सफरीला ! तेच जात नाहींत. मला तर खूप आवड आहे. पण ह्या पोरटयांच्या पायीं जमतच नाहीं. "

तिनें पदरांतून पोरीला बाहेर काढलें, पाळण्यांतून ओलें दुपटें दूर केलें व बेबीला आत ठेवीत पाळण्याला झोका दिला. बापूनें भिजलेल्या दुपटया-कडे पाहिलें. शर्टासाठीं आणलेल्या सुंदर, भारी कापडाचीं त्याच्या नकळत दुपटीं बनलीं होतीं. तो स्वतःही असाच नकळत बनला गेला होता. त्याला बायकोची चीड आली. तो समंजसपणें वागून सकाळ-संध्याकाळ मुलांना सांभाळीत होता व बायकोचा भार कमी करीत होता. चैनींत व खर्चांत काटकसर करून बायकापोरांना सुखांत ठेवूं पहात होता. पण उलट त्याचाच उपहास होत होता. त्याला वाटलें, असं आहे तर ख्ररंच मॅचला जावं, मजा करावी, आणि बायकोपोरांना पोतेऱ्यासारखं वागवावं !

तेवढ्यांत मुलें आलीं. 'काका-काका-' करीत त्रिंबकभोंवतीं घोळ घालूं लागलीं. एक त्याचे हात ओढूं लागला, एक तर खुर्चीवर चढून त्याचा चष्मा पकडूं लागला ! बापूचा विरस झाला. तो हसत गप्पा मार-णार होता, पण मुलांनीं त्याला हंसूंहि दिलें नाहीं. मुलांच्यामुळें त्याला बोलतांही येईना. कुणी आलं कीं हीं पोरटीं गोंगाट करतात, घाण कर-तात. स्वस्थपणें बसणेंही अशक्य करतात. बापू त्यांच्या अंगावर ओरडणार होता; पण तीं पोरटी त्रिंबकच्या अंगाशीं बिलगून खुषीनें बसलीं होतीं व त्रिंबक त्यांना खेळवीत होता, हंसवीत होता. त्यानें खिशांतून वड्या काढून वाटल्या. अक्काला बाहुली आणून द्यायचं, बाबा लोकांना मोटरीं-तून हिंडवायचं कबूल केलं. तें बघून बापू थक्क झाला !—त्याला हें कधींच जमत नव्हतें. तो खाऊ देई, लाड करी, हिंडायला नेई,-पण पोरांतला व त्याच्यामधला परकेपणा कधींच कमी झाला नव्हता.

'परक्याच्या पोरांना पांच मिनिटें खेळवायला काय लागतं !' तो स्वतःचंच समाधान करूं लागला. ह्या मुलांमुळें मित्राबद्दलही त्याच्या मनांत तुटकपणा भरूं लागला.

त्रिंबकला त्यानें कसाबसा निरोप दिला व तो पोरांवर खेकसूं लागला, "कुणी आलं कीं अंगांत येतं कार्ट्यांच्या !-खायला मिळत नाहीं काय कधीं ?-भीक मागतां लोकांजवळ ती ! खबरदार ह्या खोलींत पाऊल टाकलंत तर !"

पोरें स्वैंपाकघरांत धांवलीं व आईभोंवतीं चिंवचिंवाट करूं लागलीं. बापू बाहेरून ओरडला, " जेवायचं झालं असलं तर जेवून घ्या. मी मागाहून बसेन. रोज धड जेवूंहि देत नाहींत कार्टीं ! " खोलीभर तो फेऱ्या घालूं लागला. त्या कोंडाळ्यांत बसायचं, सुकुमारला भरवायचं, सुधीरचा भात कालवून द्यायचा, सुरेशने शितं उडवलीं तरी सहन करायचं-छे छे, तो कंटाळला होता. जमिनीवरची बोळकीं व बाहुल्या ठोकरीने उडवीत तो फेऱ्या घालीत होता. गळे दाबून मुलें मारून टाकावींत, असें त्याला वाटत होतें. ह्या मुलांच्या गर्दींत आपण गुदमरून मरणार, असें त्याला वाटत होतें. स्वैंपाकघरांतून येणारी पोराची पिरपिर त्याला त्रास देत होती. ...अन् पाळण्याच्या कोपऱ्यातून धांवत येणारा पोरांचा गूढ घोळका त्याला सतावीत होता !

मुलें जेवून बाहेर आली तशी तो आंत गेला. पाणी सांडलेलें, अन्न उडवलेले. मुकाट्यानें तो तसाच बाजूला पाट घेऊन बसला. अन्नाचा वास येतांच त्याला बरें वाटलें; भूक लागली. आपला राग तो विसरला. बायकोला म्हणाला, " मुद्दाम मागाहून बसलों. म्हणजे तुझ्या पंगतीचा लाभ--"

" हो, पण सुकुमार नीट जेवला नाहीं--" वाढून घेतां घेतां बायको म्हणाली, " मी उपाशी रहात नाहीं. पण पोरं...तुम्ही ओरडलांत तरी त्यांना तुमचा भारी लळा आहे "

बापूला बायकोचें बोलणें आवडले नाहीं. मुलांचा विषय तिनें काढल्यानें त्याचा पुन्हां विरस झाला. जुनेर नेसलेली, स्वैंपाक करून शिणलेली, मुलांचें करून विटलेली ही बाई परत पूर्वीसारखी प्रेमाच्या गुलगुल गोष्टी करणारच नाहीं कां ?--आतां जन्मभर हें असंच काळजीचं, प्रौढपणाचं रडगाणं गायचं ?--तो खालीं मान घालून भात कालवूं लागला.

पण बायको बोलत राहिली. तिला नेहमीं सुचणारे, रुचणारे विषय. दूध महाग झालंय्, बेबीला दांत यायला लागले, आक्काला अजून शाळेंत घातलं नाहीं, सुधीर-सुरेशला नव्या फॅशनचे कोट हवत, अन् साऱ्या पोरांचे फोटो काढायचे तरी कधीं ?...

बापू कसाबसा जेवून बाहेर आला. प्रेम संपलं, पतिपत्नीचं हितगुज संपलं, ह्या विचारानें आंचवून तो बाहेर आला. मुलांनीं गाद्या घातल्या होत्या व उशा घेऊन तीं मारामारी करीत होतीं. त्यांच्याकडे न पहातां तो खुर्चीवर बसला. वर्तमानपत्र डोळ्यांसमोर धरून बसला. ग्राइप वॉटरच्या जाहिराती, मुलांच्या भावी शिक्षणाची आगाऊ तरतूद करणारी योजना, कुठल्याशा गांवांत कुणाला एकदम झालेलीं चार मुलें...बापूला वाटलें, रागावण्यांत काय अर्थ आहे?–आदर्श पिता व्हायचा प्रयत्न करणं आपलं कर्तव्य आहे. तो उठला. गादीवर बसला. दांडगाई करणारीं मुलें थबकलीं. बापू वांकून म्हणाला, "बसा माझ्या पाठीवर, आपण घोडा घोडा खेळूं!..."

चारीं पोरें स्वार झालीं व घोड्याला चाबूक मारूं लागलीं. घोड्याचा मग सिंह झाला व डरकाळ्या फोडूं लागला. राक्षस होऊन भेडसावूं लागला. राक्षसाला सुकुमार घाबरला म्हणून मग बापू मोटर झाला. अन् अखेर विदूषक होऊन कोलांट्या मारूं लागला.

पोरें पेंगुळलीं व गाद्यांवर पसरलीं. सुकुमारला पोटाशीं घेऊन व सुरेशला मधूनमधून थोपटत बापू गादीवर आडवा झाला. ...आई नऊ महिने भार वहाते, अन् मग तीनचार वर्षें पोसते. पण पुढें मुलें मोठीं, मिळवतीं होईपर्यंत बापालाच खस्ता खाव्या लागतात, आया व्हायचं मुलींना उपजत ज्ञान असतं, मुलींना लहान मुलं खेळवायची संवय असते, पण पुरुषांना स्वतःवर पाळी येईपर्यंत कांहीं पत्ता नसतो. वडिलांची भूमिका कशी करायची, हें कळत नाहीं. विदूषक व्हायचंही जमत नाहीं...बापू मुलांना थोपटत आपल्या विचित्र आयुष्याचा विचार करीत होता.

"झोंपलीं का मुलं?" तांब्याभांडें घेऊन बायको बाहेर येत म्हणाली. पूर्वीं ती अशीच येई पण पूर्वींची केसांतलीं फुलं, गालावरची टवटवी, डोळ्यांतली आतुरता आतां गेली होती. आतां तिच्या हातांत दुधाची बाटली, खांद्यावर मेणकापड व शरीरावर निस्तेजता पसरली होती. बापूच्या डोक्यांतलें पांढरे केस नि तिच्या डोळ्याखालचीं काळीं वर्तुळें, त्याचे कोटाचें

फाटलेलें खिसे नि तिच्या पोटाच्या वाढत्या घड्या पोराच्या रूपानें गादीवर पसरल्या होत्या. बापूनें तिच्याकडें, मुलाकडें भकासपणानें पाहिलें व कूस बदलली. पण त्याला झोंप येईना. बायकोची खुडबुड चालूच होती. बेबीला बाटली देणें, मुलांच्या खालीं मेणकापड टाकणें, मध्यरात्रीं दूध तापवायला स्टोव्ह ठेवणें...बापूला सर्व दिसत होतें. ती त्याच्याकडे पहातही नव्हती, बोलतही नव्हती. त्याची ती बायको नव्हतीच जणूं!-बापू एकदम वळून पाहूं लागला. गाद्यांच्या दुसऱ्या किनाऱ्याला ती बसली होती. खरंच, किती दूर होती ती! मध्ये पांच पोरांचं, पाच आयुष्यांचं, अंतर होत. क्रमाक्रमानें एकएक दुवा जळवीत ती दुरावली होती. एक एक टप्पा टाकीत ती नवऱ्याला सोडून गेली होती. पांच पोरांची कुणी आई बनली होती. आपल्या जोडीदाराची धडाडी, ध्येय उस्कटून त्याचा पैसा लुटून, त्याला घाणेरड्या गादीवर एकटा टाकून, ती पळाली होती.

बापू हताश झाला. त्या वास येणाऱ्या गादीवर झबली-गलोत्यांनीं नि चित्रबाहुल्यांनीं भरलेल्या खोलींत तो गुदमरूं लागला. त्याचें मन आकांत करूं लागलें....त्याला साथ करीत पाळण्यापासून पेटींतले सारे स्वर साऱ्या सप्तकांत एकदम वाजू लागले. आणि त्या सोसाट्यांतून लहानलहान बालकांचा लोंढा एकसारखा रांगत येऊं लागला.—

"तारा!" तो शक्ति एकवटून घोगऱ्या स्वरांत ओरडला. पांच पोरांचे पर्वत उलंघून आपली हांक ह्या बाईपर्यंत पोचेल कीं नाहीं, त्याला कळेना. पण तिला ऐकूं आलें. बेबीला मांडीवरची खालीं ठेवून ती म्हणाली, "का हो?-काही हवंय? झोंप येत नाहीं?" ती तशीच उठली व त्याच्या दिशेनें येऊं लागली. बापू डोळे फाडून तिच्याकडे पाहूं लागला. आपली अर्धांगी ओळखूं लागला.-मंद पावलें टाकीत, एकएक मूल मागे टाकीत ती येत होती. झिजलेली, श्रमलेली. आणि तिच्या खोल नेत्रांतून वात्सल्य ओसंडत होतें. काळजीनें ती त्याच्याकडें पहात येत होती, "काय झालं?--काय हवंय?"

बापू तिच्या प्रशस्त देहाकडें, प्रशांत मुद्रेकडें, पहात राहिला. ती नवऱ्याजवळ बसली व त्याचे पाय चेपूं लागली. पोराच्या खस्ता खातांखातां नि

नवऱ्याचा कल सांभाळतांसांभाळतां ती आपलें आयुष्य उगाळून टाकीत होती. खरं म्हणजे किती लहान होती ती ! किती अल्लड, अज्ञ ! पण तिला कोणी जपत नव्हते. मायेची ऊब देत नव्हते. तिची इवलीशी आकृति पाहून बापूचें हृदय भरून आलें. तीहि त्याची एक मुलगीच होती. सर्वांत लाडकी, सर्वांत गोड मुलगी ! इतरांना हिडिसफिडिस केलं, दूर ढकललं, तरी तिला तसं करणं अयोग्य होतं. अन् तो तर तिची विचारपूसही करीत नव्हता. उलट तिच्यापासून वाटेल त्या अपेक्षा करीत होता !

अक्षयी वात्सल्याच्या भावनेनें भरलेला बापू पित्याच्या प्रेमळपणाणें तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागला. " दमलीस तारा !-ये, झोंप--" तो म्हणाला व तिला कुशींत घेऊन थोपटूं लागला.



# जोडगोळी

' जोडगोळी, जोडगोळी—' रंगीबेरंगी पट्ट्यांचा पायजमा व गंजीफ्रॉक घातलेला मॅनेजर तंबूपुढें उभा राहून ओरडून म्हणाला, ' दो दो आना, दो दो आना ! ' प्रदर्शनांतून परतणाऱ्या प्रेक्षकाना तो साद घालूं लागला, ' बाबू साबू देखो, बाबू साबू देखो—' टेबलावर ठेवलेला फोनो सुरू करून तो तिकीट-बुकं चाळूं लागला.

फोनोवर बॅंडचें ठराविक दळण सुरू होतांच तंबूच्या एका कोपऱ्यांत बस-जोडगोळी त्रासून गेली. आज एकसारखं आठ तास काम करावं लागलं होतं. अन् चाळीस दिवस प्रदर्शन चालू होतं. तसं पाहिलं तर गेलीं चाळीस वर्षे हा कार्यक्रम चालू होता. खेड्यांतल्या जत्रांपासून शहरांतल्या प्रदर्शनांपर्यंत. चीन-जपानपासून न्यूयार्क-वॉशिंग्टनपर्यंत. प्रत्येक ठिकाणीं तेंच. प्रेक्षकांपुढें दोन फेऱ्या मारावयाच्या, नांवं सांगायचीं, एखाद्या प्रश्नाचं उत्तर द्यायचं. आणि प्रेक्षकहि तेच. भेदरलेलीं मुलें, किळस येऊन नाकाला फडकं लावणाऱ्या बायका, ' बनावट आहे सारं ! ' 'अजब आहे बुवा—' इत्यादि उद्गार काढणारा पुरुषवर्ग !—जोडगोळी कंटाळून, कावून, गेली.

बाबूच्या कपाळावर आंठ्या उमटल्या. साबू म्हणाला, " त्रासलों बुवा." बाबूच्या उजव्या हाताला मुंग्या आलेल्या ध्यानांत येतांच साबूनें डाव्या हातानें ती बोटे कुस्करलीं. दोघेंहि एकाच लयींत, एकाच स्वरांत सुस्कारे टाकीत बसले.

जराशानें साबू म्हणाला, " हा मॅनेजर पैशाचा फारच लोभी दिसतो. उगाच कॉन्ट्रॅक्ट दिलं बेट्याला. पिळून काढतोय् नुसता. मला—"

बाबू उसळून म्हणाला, " समजलों. तुला म्हणायचंय् कीं आपण खूप इस्टेट केली आहे, आपलें वय झालं आतां, कष्ट करणं कमी केलं पाहिजे ! पण मला खूप जगायचं आहे अजून....खेरीज मूल होणार आहे. "

साबूहि संतापला. " चिडायला काय झालं मग ? मूल मलाहि होईल कीं. अन् मला कुठें मरायची घाई आहे ? पण आजकाल आपण थकतों हें सांगितलं तर—"

" बरं बरं. सांगतोस कशाला ? तुझ्या मनांतलं मला कळत नाहीं का ! अगदीं बोलायलाच कशाला हवं ? "

" मग काय करूं ? एकमेकाच्या मनांतलं एकमेकाला लगेच कळतं म्हणून आपण अजिबात गप्प राहतों; पण त्यामुळें मला वेड लागायची पाळी आली आहे. "

तंबूचा पडदा फडफडल्यामुळें दोघेहि गप्प झाले. मॅनेजर दोन लहान मुलांना घेऊन आला. चार आण्यांसाठीं मॅनेजरनें चालवलेली धिंड पाहून साबू संतापला. साबूच्या रागाबरोबर बाबूचें कपाळ नकळत आठ्यांनीं भरूं लागलें. पण त्यामुळें चिडून बाबू उठला. साबूलाहि धडपडत उभें राहावें लागलें. दोरी बांधलेल्या जागेत जोडगोळी फेरी घालूं लागली.

दोन्ही मुलं विस्मयानें पहात होतीं. अंगठा चोखणारा गुटगुटीत मुलगा म्हणाला,"कमरेला एकत्र चिकटले आहेत दोघे ! पण विजारी कशा छान शिवल्या आहेत. पण हे निजत कसे असतील रे ?—"

काळा लुकडा पोर भुवया उडवीत बोलला, " अं–फुकट दोन आणे गेले ! दोन पेहेलवान कुस्ती खेळतांना असा पेंच घालून उभे राहतात–अन् कुत्र्यांचं जळं पाहिलंय्स ?–सहा पायांचा कोळी तर असाच तिरका चालत जातो. ह्यांत काय गंमत आहे ? "

जोडगोळीकडे टकमकां पाहात दोघे बडबडत होते. फेरी झाल्यावर मॅनेजरनें नेहमींप्रमाणें जोडगोळीला विचारलें, " नाम बोलो ! "

" गोस्या ! " गुटगुटीत मुलगा चाचरत सांगूं लागला. मॅनेजर मोठ्यानें हंसला. भान विसरून जोडगोळी दोन्ही तोंडांनीं खिदळूं लागली मुलाला आपली चूक कळली. लाजून तो सोबत्याचा हात धरून पळून गेला—

जोडगोळी बराच वेळ पोटं धरूधरून हंसत राहिली. हंसतांना एममेकांचे हात दाबले. डोक्याला डोकें घासलें. बऱ्याच दिवसांनीं इतकं मोकळेपणानं, एकदिलानं हंसायला मिळालं होतं.

तेवढ्यांत मॅनेजरने हिशेबाचा कागद काढला. बाबू उत्सुकतेनें कागदाकडे पाहूं लागला. किती मिळकत झाली, कमिशन वजा जाऊन किती रक्कम मिळेल, त्याचा अर्धा हिस्सा म्हणजे किती—बाबूच्या मनांतलें

साबूला समजत होतें नि त्याचा चेहरा उतरत होता. साबूची उदासीनता लक्षांत येऊन बाबू एकदम दचकला. घाईनें हिशेब करून त्यानें सही केली. साबूनेंही सही केली. आपली सही बाबूपेक्षां बरीच निराळी घटली आहे हें निरखलें. दोघांनींहि मग एकदमच एकमेकाकडे पाहिलें. संशयानें, उद्वेगानें, तिरस्कारानें......

मॅनेजरने मोटार मागवली. जोडगोळी जपून आंत शिरली. कशीबशी चार हाताच्या गणपतीसारखी बसली. दोघेहि दोन दिशांना पहात प्रदर्शना-बाहेर निघाले.

रस्त्यावरची मोकळी हवा लागतांच बाबूला बरें वाटलें. शरीराचा जेवढा भाग साबूपासून सुटा होता, दूर होता, तेवढा सैल सोडीत तो मागें रेलला व डोळे मिटून बसला. हॉटेलांत पोचलें कीं बायकोकडून अंग चेपून घ्यायचं, आंघोळ करायची नि खूप खाऊन पेंग ओढीत बसायचं असा सुखद विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. त्या गोड गुंगींत आणिकहि विचार आले. लवकरच आपल्याला मूल होईल. मग आपण मुलाला नि बायकोला घेऊन छानसं घर बांधून त्यांत राहूं! प्रवास नि प्रदर्शन पुरें झालीं. वणवण हिंडून जीव हैराण झाला आहे नुसता. इस्टेटीच्या मिळेल त्या वाटणींत मजा करूं उरलेल्या आयुष्यभर. फक्त ह्या बाबूचं लोढणं आहे. त्याच्यासाठीं निम्मा दिवस त्याच्या घरीं काढावा लागेल. हा नसता तर–हा नसता तर––अरे अरे! काय हा त्रास—

साबू हळूच म्हणाला, "कां माझा राग करतोस?"

बाबूची विचारमालिका तुटली. तो दचकून सांवरून बसूं लागला. साबू घोगऱ्या आवाजांत म्हणाला, "आजकाल तूं माझा रागराग करतोस. पण असं करून कसं चालेल? जन्मापासून आपण एकत्र आहोत; दैवानें आपल्याला एकत्र चिकटून ठेवलें आहे. पंचावन्न वर्षे आपण अशी काढलीं. दुःखांत, दारिद्र्यांत. अन मजेंत, वैभवांत. डॉक्टरनीं नि कोर्टांनीं जरी आपण दोन निराळीं माणसं आहोंत म्हणून ठरवलं तरी आपण एकदिलानें राहिलों. एकमेकांचे संसार सांभाळून घेतले. आपल्याला स्वतंत्र, खाजगी

आयुष्य नाहीं. एकमेकाच्या मनातले विचारसुद्धां बोलण्याआधीं एकमेकांना उमगतात--पण म्हणून आपण आजवर एकमेकांचा तिटकारा केला नाहीं. मग आतांच कां तुला असं वाटूं लागलं ? तुला दूर जायचं आहे का ? पॅरिसचा डॉक्टर म्हणतो तशी शस्त्रक्रिया करायची आहे का ?--काय हवंय् तुला ? काय चुकतंय् माझं ? "

बोलतां बोलतां साबूचा आवाज अगदीं गद्गदित झाला व त्याच्या खोल गेलेल्या डोळयांत पाणी उमटलें. बाबूला सारें जाणवलें. त्याचेही डोळे ओलावले. आपण साबूचा तिटकारा करतों हें चूक आहे हें त्याला कळत होतें. साबूचा तिटकारा म्हणजे स्वतःलाच त्रास हेंहि जाणवत होतें. तरी पण साबूबद्दल राग वाटत होता. सध्याच्या स्थितीबद्दल कंटाळा आला होता. एकत्र जगूनसुद्धा असं कां वाटूं लागलं ? बाबू बावरला. त्याचे डोळे डबडबले. त्यानें खिशांतून रुमाल काढला; पण आपल्या थोटक्या हातानें फक्त साबूचे डोळे कोरडे करीत तो म्हणाला,

" नाहीं रे, मला माफ कर ! तुझा राग नाहीं करणार मी. माझ्या बायकोपेक्षांहि तू मला जवळचा आहेस. आपण एकच आहोंत--"

हॉटेलच्या दाराशीं मोटर एकदम थांबली. दोघेहि दचकले. चारी हात, चारी पाय सांवरूं लागले. दोन्ही डोकीं मागल्या बाजूस आदळलीं. चिकट-लेल्या कमरांतून जराशी कळ आली.

मोटरच्या दारांतून जोडगोळी धडपडत उतरली. व्हरांडयांत बाबूची बायको उभी होती. ठेंगणी ठुसकी, खूप नटलेली अन् पोट पुढें आलेली. बाबूचा हात धरून ती म्हणाली, " हॅलो डेव्हिड ! "

बाबूच्या बाजूनें चालतांना तिनें जरा मान पुढें करून, तिरकस चाल-णाऱ्या साबूला म्हटलें, " हॅलो दयानंद ! "

दयानंद कांहींच बोलला नाहीं. आपला 'सुटा' हात विजारीच्या खिशांत अडकवून तो जिना चढूं लागला. आपली स्वतःची बायको बाहेर भटकते, कुणा कुणाबरोबर पत्ते खेळते, दारू पीत बसते ह्या विचारानें तो व्यग्र झाला. आतां मॉली आला कीं तिला हंटरनें सडकून काढायचें त्यानें ठरवलें.

डेव्हिडनें आपल्या बायकोचा हात प्रेमभरानें दाबून म्हटलें, "कशी काय तब्येत, डॉली? जेवलीस तूं?"

डॉली डुलत म्हणाली, "आत्ता जरा पोट थांबलय्! अन् जेवते कसली! वासनाच नाहीं–"

"तरी पण थोड सूप किंवा फळं खायचीस—"

बोलतां बोलतां दोघंही पायरीवर थबकलीं. दयानंदालाहि थांबावं लागलं. तो चिडला नि त्यानें आपलें अंग पुढें ढकललें. त्याच्यासह डेव्हिडलाहि हलावें लागलें. अन् डेव्हिड बरोबर डॉलीहि पुढें झाली. कंबर चिकटलेलें दयानंद व डेव्हिड आणि हात गुंतविलेली डेव्हिड व डॉली जिना चढून खोलींत गेलीं.

खिडकीशीं खास बनवलेल्या खुर्चीत बसत दयानंद म्हणाला, "अंग आंबून गेलं आहे. आंघोळ करायची आहे बुवा." त्यानें आपले केंस कुस्करले व कॉलर सैल केली. कढत पाण्यानें साबण लावून स्नान करायला तो आतुर झाला होता.

पण डेव्हिड खुर्चीच्या हातावर रेललेल्या आपल्या बायकोशीं बोलण्यांत रंगला होता. आज ती कुठेंच गेली नव्हती नि नवऱ्याची आठवण काढीत घरीं बसली होती. बंगला बांधायला खर्च किती येईल व बाळंतपणाची काय तयारी करायची याचे हिशेब तिनें पक्के केले होते. डेव्हिड सारं कौतु-कानें ऐकत होता व तिचा कुरूप चेहरा कुरवाळीत होता.

दयानंद कंटाळून गेला. आपली बायको बाहेर गेली आहे ह्याचें शल्य त्याला जास्तीच बोचूं लागलें. दोघी बहिणी–बहिणीच; पण केवढं अंतर दोघींच्या स्वभावांत! डॉली आपल्या नवऱ्याला खेटून असते, खुषींत असते. नवऱ्याची सेवा करण्यांत, त्याचा संसार सजवण्यांत धन्यता मानते. आणि तिचीच पाठीला पाठ लावून आलेली मॉली मात्र नवऱ्याचे पैसे उकळून परपुरुषाबरोबर हिंडते. कधीं प्रदर्शनांतला अधिकारी, कधीं सर्कशीं-तला खेळाडू, कधीं हॉटेलांतला प्रवासी...दयानंदला मॉलीची चीड आली. आणि खूप ओढहि लागली! शेजारींच डेव्हिड डॉलीचे मुके घेत बसला

होता; अन् त्याला नुकतेच हात चोळावे लागत होते. चवताळून तो ओरडला,

" छोकरा, छोकरा—मला आंघोळ करायची आहे. छोकरा—"

डॉलीनें कपाळाला आंठया घालून डेव्हिडआडून म्हटलें,

" छोकरा आज रजेवर आहे. चला, मी घालतें आंघोळ—"

" नको मग !–आतां झोपूंच या. "

दयानंदाचा उद्वेग डेव्हिडला उमगला. तो उठत म्हणाला, " वा–आंघोळ केलीच पाहिजे. चल ना ! पाणी काढ ग. "

डेव्हिडनें जवळ जवळ ओढूनच दयानंदला उठवलें. डॉली दूर झाली व नाचतच न्हाणीघरांत गेली. डेव्हिड हलकेच उद्गारला,

" तिला सातवा महिना लागला आहे. अन जुळं नक्की नाहीं. "

" हं !"

" पुढल्या आठवडयांत आपण इस्टेटीच्या वांटण्या करून टाकूं. "

दयानंद मूक राहिला.

" मला वाटतं, मॉलीशीं तूं घटस्फोट घ्यावास. "

दयानंद भडकून गेला. आडवं पाडून डेव्हिडला पिटून काढावसं त्याला वाटल. पण तेवढ्यांत डॉली आली. दोघांना घेऊन ती न्हाणींत गेली. हलक्या हाताने त्याचे वेगळाले सद्रे व जळवलेली विजार काढली. कोमट पाण्याच्या पांढऱ्या टबांत त्यांना बसवूं लागली. साबणाचा फेस डेव्हिडच्या तोंडाला फांसत ती खिदळत होती. कमरेच्या जुळालेल्या जागीं साबण लावताना तिचे ओठ असूयेनें घट्ट होत होते.

अंग कोरडें करतांना ती म्हणाली, " दयानंद, तुझ्याऐवजीं डेव्हिडशीं माझी कंबर जुळली असती तर केवढी बहार झाली असती ! "

तिचा हात दूर करीत दयानंद म्हणाला,

" जास्त पैसा मिळाला असता ! पण लग्न नसतं करता आलं. लग्नाचं सुख नसतं मिळालं. उलट भाऊ–बहिण झालां असतांत–"

" अय्या, खरंच कीं !–बाकी तुझेच उपकार म्हणून–"

" आटप लवकर–"

डेव्हिड मध्यें पडून म्हणाला,

" भूक लागली आहे आम्हांला-अन् तूं बडबडते आहेस. "

डॉली गेल्यावर डेव्हिडनें मान तिरकी करून दयानंदाकडे पाहिलें. ' माझा राग नको करूं असं तूं म्हणतोस; पण माझ्या बायकोचा मात्र तूं राग करतोस ' असं त्याला म्हणायचं होतं. पण दयानंदानें ते बोलायच्या आधीच ओळखलें. डेव्हिडहि बोलला नाहीं.

दोघांनीं कपडे केले. आरशापुढें दोन डोकीं प्रकटलीं. आपापले वेगळ्या वेगळ्या रंगाचे कंगवे घेऊन केंस बसवले. डेव्हिडनें केस उलटे बसवले, दयानंदनें मधोमध भाग पाडला. डेव्हिडनें आपली खुरटी दाढी कुरवाळली. दयानंदनें दांताची कवळी काढून पाहिली. एकमेकांपेक्षा आपण कुठे वेगळे दिसतों का हें नेहमींप्रमाणें न्याहाळलें. दाढीमुळें, कृत्रिम दांतांमुळें, केसाच्या रचनेमुळें चेहऱ्यांतलें साम्य बरेंच कमी झालें होतें. सहज जवळ उभे असलेले दोन अनोळखी इसम वाटत होते ते !--दोघेहि खूष झाले.

डॉलीनें खास बनविलेली खुर्ची पुढें ओढली व त्यापुढें चंद्रकोरीच्या आकाराचें टेबल ठेवलें. खायच्या बशा ती आणूं लागली तशी दयानंद उद्गारला, " मला नको. मला भूक नाहीं ! "

डेव्हिड व डॉली दोघेंहि दचकलीं. डेव्हिड म्हणाला, " थोडं खा कीं. मघांशीं तर भूक लागली होती. डॉली, दे ग त्याला अंडं सोलून. "

डॉली नाइलाजानें दयानंदाच्या बाजूला उभी राहिली. दयानंद ' नको ' म्हणाला तरी नवऱ्यासाठीं तिला तसंच उभं रहावं लागलं. हळुहळू तिला दयानंदाची दया आली. डेव्हिडच्या व त्यांच्यांत कितीसा फरक होता ? दोन शरीरें असलीं तरी त्यांचीं मनं नि मेंदू एकाच तालावर चालत होतीं. नवऱ्यासारखा होता तिला तो ! त्याच्यामुळेंच तिला आज दहा वर्षे सुखांत संसार करतां आला होता. नवऱ्याबरोबर रात्ररात्र मजा करतांना तो मुकाट राही, तक्रार करीत नसे, त्रास देत नसे. आणि पैशाच्या व्यवहारांत हातचलाखी केली तरी गप्प राही. शुंभासारख्या बसलेल्या दयानंदाच्या पाठीवर प्रेमळपणें हात ठेवत ती म्हणाली,

" मॉलीच्या बाबतींत कांहींतरी—"

दयानंद एकदम उसळला. ओरडून म्हणाला, " माझ्या बाबतींत तुम्ही लक्ष घालूं नका. तुम्ही तुमच्या मुलाबद्दल, घराबद्दल बोलतां तेव्हां मी एक शब्द तरी बोलतों का ? मग माझ्या खाजगी—"

" खाजगी ? " डॉली म्हणाली. तिला तेवढ्यांतहि हंसूं फुटणार होतें. पण डेव्हिडला ढांस लागली. जोराजोरानें तो खोकूं लागला; छाती दाबून धरूं लागला. पाणी मागूं लागला. डेव्हिडला शांत करायला दोघेहि घाबरे झाले. डॉलीनें पाणी पाजलें. पाठ व छाती चोळली. कपाटांतून ब्रँडी काढून थोडीशी दिली. दयानंदाला काय करावं तें कळेना. ' शांत हो, घाबरूं नको–' तो म्हणत होता; पण स्वतः घाबरा होत होता. डेव्हिडच्या ढांसेबरोबर त्याच्याहि छातींत धडधडत होते. डॉली अखेर घाबरून दोघांच्या पाठी एकदम चोळूं लागली !

बऱ्याच वेळानें डेव्हिड शांत झाला. खोकून खोकून तो अर्धमेला झाला होता. खाल्लेलं ओकून पडलं होतं. नि अंगाला घाम फुटला होता. धापा टाकीत तो दयानंदाला म्हणाला, " माफ कर–माफ कर ! " दयानंदाचें अंगहि धुसळून निघाले होतें. त्याचें हृदय हबकलें होतें व पोटात ढवळलें होतें.

आपल्या नवऱ्याला नि उपनवऱ्याला शांत करता करतां डॉलीच्या नाकीं नऊ आले. मागें एकदा दयानंदचा पाय लचकला होता तेव्हां असाच विचित्र, विद्रूप प्रसंग आला होता. आणि गेल्याच महिन्यांत दोघे तापानें पडलें होतें, तेव्हां तर तिच्या काळजाचें पाणी झालें होतें. ह्यांना जपण, दोघांना एकदम सांभाळणं, हें जुळ्या मुलांना पोसण्यापेक्षांहि कितीतरी अवघड होतं ! भीतीनें तिच्या पोटांत फिरूं लागलें. तिच्याहि अंगाशीं एक जीव जखडला होता कीं !—डॉलीनें दोघांना हलकेंच उठवलें. पुन्हा एकदां पाणी पाजलें व पलंगाकडे नेलें. प्रशस्त पलंगावर गिर्द्या व उशा कोन साधून टाकल्या. त्या वेटोळ्यांत दोघांचीं शरीरें अलगद विसांवलीं. मग तिनें दिवा मालवला. डेव्हिडचें चुंबन घेऊन व दयानंदच्या माथ्याचा मुका घेऊन ती हलकेंच दुसऱ्या खोलींत झोंपायला गेली.

डेव्हिड झोंपेची आराधना करूं लागला. पण दयानंदाला झोंप येईना. डोळे उघडे ठेवून तो सताड पहुडला होता. जराशानें जिन्यांत पावलें वाजली. दयानंद उद्गारला, " मॉली आली वाटतं-" त्याचे कान टवकारले, डोळे चमकले नि अंगभर रक्त उसळलें. त्यामुळें डेव्हिडची झोपमोड मात्र झाली. कुणा पुरुषाचीं पावलें व्हरांड्यांतून वाजत गेलीं. दयानंदाची तगमग झाली. कांहींतरी खाण्यासाठीं, मॉलीला मिठी मारण्यासाठीं तो विलक्षण व्याकुळ झाला. पण डेव्हिडला आनंद झाला. आतां शांतपणें झोपतां तरी येईल--

तेवढ्यांत दयानंद ओरडला, " ऊठ, मला झोंप येत नाहीं ! "

डेव्हिड दचकला, "नको. मला झोंप येत नसली तर नुसता पडून राहा. मी दमलों आहें. मला उठवत नाहीं. "

तें ऐकताच दयानंद चवताळला. धडपडत उठूं लागला. कमरेचा दुवा दुखूं लागला. नीट उठतां येईना तरी त्यानें तसेंच अवसान आणलें. डेव्हिडचें डोकें जड झालें व शरीर तोल सांवरूं लागलें. अखेर दोघेंहि अंथरुणांत बसले.

अंधारांतच डेव्हिड विनवूं लागला-" मला बरं वाटत नाही रे !-निजूं या आपण. निदान असंच बसूं या ! हवं तर गप्पा मारूं—"

" गप्पा ? तुझ्याशीं ? मग स्वतःशींच बडबडलेलं काय वाईट ? "

" मग-मग बुद्धिबळ खेळूं-"

" हं !-तुझ्याशीं खेळायचं म्हणजे डाव्या हातानें उजव्या हाताशीं खेळण्यासारखं आहे—"

डेव्हिडला रडें कोसळलें. " मग काय करायचं ? काय करूं मी ?—" त्याला वाटलें, डॉलीला हांक मारावी. त्याला वाटलें, हळूंच दयानंदपासून तुटून दूर व्हावें !

दयानंद द्वेषानें भरून गेला. डेव्हिडचा लबाड स्वभाव त्याला पुरता समजला होता. केवढा आप्पलपोटा होता तो ! नेहमीं स्वतःचे चोचले पुरवून घेई. खाण्यापिण्याच्या, कपड्यालत्याच्या नि झोंपायच्या बाबतींत ! पांघरुणसुद्धां स्वतःच्या अंगावर ओढून घेई; अन् मॉली जरा जवळ आली तरी हा कांहीं कांहीं सबबी सांगे...

" मला शतपावली करायची आहे. " दयानंद खुनशीपणानें म्हणाला. त्यानें चटकन् दिवा लावला व डेव्हिडसह तो पलंगाखालीं आलासुद्धां !-- आपल्या वर्तनाचें त्यालाच आश्चर्य वाटलें. कांहीं तासांपूर्वी तो डेव्हिडचा राग शांत करीत होता व गोडीगुलाबीनें रहायला विनवीत होता. पण आतां रहाटगाडगें फिरलें होतें,नाणें उलटें पडलें होतें ! दोघांनीं एकाच वेळेस चिडायचा, रडायचा काळ संपून आतां एकेमकांपासून वेगळं, विरुद्ध वर्तन करायचा क्रम सुरू झाला होता....

कमरेशीं चिकटून फरपटत फिरणारी, चार हातपाय नि दोन डोकीं असलेली, भयानक राक्षसी सांवली खोलीच्या भिंतीवर व छतावर वांवरत होती. खोलींत बाबूसाबूचे अनेक वेषांतले तऱ्हेतऱ्हेचे फोटो लटकत होते. चंद्रकोरीच्या आकाराचीं खुर्च्याटेबलें, गिर्द्याउशांनीं भरलेला प्रचंड पलंग, रंगीबेरंगी कापडांच्या घड्यांतून दिसणाऱ्या विचित्र विजारी-खोलीला वेगळेंच रूप आणीत होत्या. आरशांचे, कंगव्यांचे,बुटांचे, काठ्यांचे, टोप्यांचे, ट्रंकाचे दोन दोन जोड जागजागीं पडले होते.:अपुऱ्या उजेडांत सारी खोली जादूनें, भुतांनीं भरली आहे असें वाटत होतें.

वेगानें फेऱ्या घालीत रागानें दयानंद बोलूं लागला, " आपण एकत्र जन्मलों, जगलों. पण आज तूं सुखी आहेस नि मी दुःखी आहें. आपल्याला शिंकसुद्धां बरोबर येत असे,नि आपल्या हंसण्याचा आवाजसुद्धां सारखा असे. पण आतां आपणांत ही कंबर काय तीं उरली आहे.काय राहिलं आहे बाकी? खाजगीं नांवं सारखीं नकोत म्हणून तूं नांव बदललंस.अन् धर्महि बदललास ! अन् कायद्याचा आधार घेऊन आतां वांटणी मागतोस ! एकटं झाल्यावर कशाला एकत्र रहायचं ? जगायचंच कशाला ?—तूं असा वैभवांत राहून मला दुःखांत राहावं लागणार असेल तर ? आज तुझी बायको तुझ्यावर खूष आहे. तुला मूल होणार आहे, अन्-अन हलकटा, माझ्या हिश्श्यांतला पैसाहि तूं बराचसा पळवला आहेस. माझ्या गरिबीचा, गप्प रहाण्याचा फायदा घेऊन !मी गप्प राहिलों. पैसे गेले, बायको व्यभिचारी निघाली, तरी गप्प राहिलों. पण लक्षांत ठेव. मला टाकून, मला टाळून तुला सुख लुटता येणार नाहीं. मी अडवीन, सूड घेईन ! "

डेव्हिड मरगळून गेला होता. त्याला चालण्याची, बोलण्याची, शक्तीच उरली नव्हती. ओढण्यासारखा तो लळत लोंबत चालला होता. इतकीं वर्षे एकत्र जीवन कंठून, शरीरधर्माच्या बाबतींत विलक्षण तडजोड, जुळवणूक करून आणि मनोवृत्तींची आत्यंतिक एकतानता अनुभवूनसुद्धां आपल्यांत अंतर वाढत आहे ह्याचा त्याला विस्मय वाटत होता. शरीरें संलग्न असतांना मनातले विरोध वाढवणें केवढें घातुक आहे ह्याची जाणीव होत होती. शरीरें कुठवर अशी कळ कंठणार व त्याचा सूड मेंदू कसा घेणार ह्याचा अंधुक अंदाज येत होता. स्वतःच्या डोक्यांतलें चक्र व दयानंदाच्या तोंडाचा पट्टा तोडण्यासाठीं तो अखेर बळेंच खोकूं लागला.

" ठसकूं नको. माझ्या छातीत दुखूं लागतं " दयानंद दचकून म्हणाला. मग घाईघाईने तो डेव्हिडला ओढून नेत पलंगाकडे गेला. बळ एकवटून लोळागोळा झालेल्या डेव्हिडला त्यानें स्वतःसह वर ढकललें. अंगाअंगाशीं उशा सरकवीत दोघेहि आडवे झाले. निजल्या निजल्या दयानंद डेव्हिडची छाती चोळूं लागला. काळजीच्या स्वरात म्हणाला, " शांत पडून राहा. घाबरूं नको. मी सहज बोललों तुला. माझा स्वभाव तुला ठाऊक आहे. स्वस्थ झोंप. "

डेव्हिडनें डोळे मिटले. पण त्याला झोंप येईना. श्वासहि घेतां येईना. नाहीं नाहीं तें सुचूं लागलें. नाहीं नाहीं तें आठवूं लागलें. मूल होईपर्यंत त्याला जगायचें होतें. मुलाबाळांसह बंगल्यांत राहायचें होते. पण पलंगांतून आपण नाहींसे होत आहोंतसं त्याला वाटूं लागलें.भयंकर भीतीनें दयानंदला, डॉलीला हांक मारायचा यत्न केला. पण त्याला बोलतां येईना की हलता येईना ! बळ एकवटून तो आपलं बाळ कसं दिसेल हें पाहूं लागला.पण आज प्रदर्शनांत पाहिलेला तोंडांत अंगठा घालणारा गोस्या त्याच्यापुढें ठाकला... हळू हळू त्याला स्वतःचें लहानपणचें रूप दिसलें.—झाडाखालीं तीं कुरूप, विद्रूप जोडगोळी भीक मागत होती. लोक भिऊन पळत, दगड मारीत ! ...मग त्याला दादा दिसला.आठ आण्यांता विकत घेऊन दादानें त्यांना भारी किंमतीचे रंगीबेरंगी कपडे केले व खूप खावयाला दिलें. डेव्हिडच्या डोळ्या-पुढें जत्रा, प्रदर्शन, तंबू, फेऱ्या, फेऱ्या, प्रेक्षक, प्रवास भर वेगानें फिरू

लागले....ते सारखे फेऱ्या घालीत होते, सारखा प्रवास करीत होते. लाखों लोक त्यांना पाहायला जमत व लाखों रुपये त्यांच्या पेटींत जमत. दादानें हंटरनें मारलेलें त्याला जाणवलें व दादाला दिलेला विषाचा पेलाहि पुढें आला !...दादाच्या दोन्ही पोरींनीं, डॉली-मॉलींनीं मारलेल्या मिठ्या, त्यांच्यासह काढलेली पहिली रात्र-सारं सारं स्मरलं !...डॉक्टरांच्या सभेतले दृश्य; एका धनाढ्य स्त्रीनें बोलून दाखवलेली लालसा; अन पुन्हां आजचा गुटगुटीत गोष्या...

डेव्हिडच्या घशाची घरघर ऐकूं येताच दयानंद दचकला. त्याला वाटलें कीं डेव्हिड झोंपेंत घोरतो आहे; किंवा धाप लागल्याचे ढोंग करतो आहे. पण हळूहळू ती घरघर विरूं लागली. दयानंदच्या छातीवर कांहींतरी दडपण पडल्यागत झालें. डोक्याखालीं उशी सरकवून तो कष्टानें वळून पाहूं लागला. "डेव्हिड-डेव्हिड" म्हणून हांका मारूं लागला. आपल्या अंगानें त्याला धक्का देऊं लागला. पण डेव्हिड शांत होता. दगडासारखा, प्रेतासारखा पडला होता. डेव्हिड मेला ! मेला !!-दयानंद कावराबावरा झाला, काळा-निळा झाला. त्यानें एकदम उठायचा यत्न केला. पण अंगातलें बळच गळले होते. त्याच्या घशाला घाम सुटला नि त्याला ओरडतांहि येईना. आंतल्या आत त्याचें मन आक्रांत करूं लागलें. 'डेव्हिड, नको रे मरूं ! -मला सोडून नकों रे जाऊं ! पुन्हां मी तुला बोलणार नाहीं, छळणार नाही. माझे सगळे पैसे घे. हवे तर तुझ्या घरांत, तुझ्या मुलाबाळांत राहूं आपण. पण असा जगांतून जाऊं नकोस ! तूं गेल्यावर माझं कसं होणार ? मी-मी कसा जगणार ? तूं मेलास कीं मीहि संपलो. सक्तीनें संपलो ! तुझ्याबरोबर मलाहि पुरतील, जाळतील. जिवंत जाळतील ! मला जगायचं आहे. डेव्हिड डेव्हिड-देवा-देवा-डेव्हिड-"

तेवढ्यांत दार वाजलें. पंचप्राणएकवटून दयानंद पाहूं लागला. त्याला वाटले, डेव्हिडचें प्रेत न्यायला लोक आले. प्रेत फार वेळ ठेवलें तर कुजूं लागेल. आपली जिवंत प्रेतयात्रा, आपली पेटलेली चिता पाहतांच तो अर्धमेला झाला. मग त्याला वाटले, डॉली आली डेव्हिडची ती विधवा आपल्याला जिवंत पाहून भडकेल. आपला सूड घेईल. आपल्याला ठार मारील !

डॉलीच्या पाठीवर फिरणारा हात आठवून तो गुदमरून गेला. डॉलीचा स्पर्शापासून सुटायला, डेव्हिडच्या प्रेतापासून दूर जायला, तो तळमळूं लागला. शरीरांत शिरलेल्या मृत्युपासून मुक्त व्हायला धडपडूं लागला. ...पण त्याच्यां कमरेंतून कळ येत होती, रक्त गोठलें जात होते, व हृदयाचे ठोकें मंदावत चालले होतें...

...दार उघडून रंगलेली झिंगलेली मॉली आंत आली. पलंगापाशीं डुलत गेली व शांत निद्रा लागलेल्या आपल्या नवऱ्याकडें नि मेव्हण्याकडें डोळे फाडून पाहूं लागली.

★ ★ ★

# नवी सून

सकाळ सुरू झाली, पण सून अजून उठली नव्हती. चांगले साडेसहा वाजायला आले होते. एव्हांना चहाचं आटोपून चूल पेटायला पाहिजे होती. साडेदहाच्या आंत जेवण करून मैलभर चालत जायचं म्हणजे असा आळशीपणा करून भागायचं नाहीं. वेणीफणी करून घ्यायची व तूप वाढायच्या वेळीं पुढें यायचं हें फक्त ओंव्यांत व उखाण्यांत उरलं होतं. आतां सारा स्वैंपाक उरकायचा, उष्टींखरकटीं करायचीं व कचेरींत सहा घंटे आंकडेमोडी करायला जायचं नाशिबीं आलं होतं. त्याला इलाज नव्हता. अन् तें नीट करायचं म्हणजे उन्हं पडेपर्यंत नवऱ्याशीं गुलगुलत बसणं व सारा वेळ हिरव्या बांगड्या वाजवीत घरभर हिंडणं उपयोगाचं नव्हतं...

तात्यासाहेबांच्या चित्तांत चलबिचल झाली. सून झोंपली होती त्या खोलीच्या बंद दाराकडें त्यांनीं चिडून दोनचारदां दृष्टि टाकली. काल रात्रीं बराच वेळ खोलीत दिवा जळत होता. मागल्या अंगच्या बिऱ्हाडांतलीं मंडळी सिनेमाच्या शेवटच्या शोहून परतली तेव्हा दिंडीची कडी' काढायला तात्यासाहेब उठले होते. त्या वेळेला खोलींत दिवा होताच. सूनबाई नि मध्या खिदळत होतीं. उद्यांपासून ती नोकरीवर जाणार म्हणून दोघं आनंदांत असावींत. दिंडी बंद करून तात्यासाहेब अंथरुणावर आडवे झाले, तरी त्याना नीट झोंप येईना....आणि आतांही गादी गुंडाळतांना त्यांना अस्वस्थता चावत होतीच.

थरथरणाऱ्या हातांनीं ते उशीवरचे ढेकूण पकडीत होते. आणि त्यांच्या नजरेपुढें सुनेची मूर्ति सारखी तरळत होती. आठ महिन्यांपूर्वीं ते तिला पहायला गेले होते. तिचं रूप त्यांना आवडलं होतं. पण ती कॉलेजांत इंटरच्या वर्गांत आहे हें कळल्यावर ते विचारांत पडले होते. साधा बी. ए. झालेल्या आपल्या मुलाला ही पोर डोईजड तर नाहीं ना होणार ? कॉलेजांत जाणारी मुलगी स्वैंपाक काय करणार ? सासूसासऱ्याचा मान काय राखणार ?—तिच्या वैगुण्यावर तोड म्हणून हुंड्यांत वाढ करण्यांत आली;

तीहि तात्यासाहेबांना आठवली. हुंड्याचे सहाशें रुपये त्यांच्या कानांत वाजूं लागले.ते दचकून पाहूं लागले. सून अजून शांतपणें झोंपली होती...हुंडयाचे रुपये वाजत होते. घडयाळाची टकटक वाढत होती. वेळ जात होता. उशीरं होत होता....

तात्यासाहेबांना वाटलं, तिला हांक मारावी, उठवावं. पण त्यांना धीर झाला नाहीं. त्यांनीं गाद्या गुंडाळल्या, तांब्याभांडं घेतलं व ते खालीं आले. बायको स्टोव्हशीं खुडबुडत होती तिला ते म्हणाले, "सूनबाई उठली नाहीं अजून ?"

"लवकर कधीं उठते ती ?–अन आजपासून नोकरीवर जाणार आहे ना ती ! आत्तांपासनच तिला वाटायला लागलंय् कीं, आपण विजयालक्ष्मी झालों. घांदरटीनें स्टोसुद्धां भरून ठेवला नाहीं."

"विसरली असेल. एवढं घालूनपाडून कशाला बोलायला हवं लगेच !–" तात्यासाहेब खेकसले व मोरीकडे गेले. मघाशीं आपण सुनेला हांक मारायला घाबरलो आणि आता तिची उगीचच तरफदारी केली. आतां ती पैसे मिळवणार, पैसे आणून देणार, म्हणून तात्यासाहेबांना स्वतःची शरम वाटली व त्यांनीं तोंडाला राखुंडी लावली.

किती तरी वेळ ते तोंड धूत होते, पाण्याशीं खेळत होते. हुंड्याचे सहाशे रुपये त्यांना अजूनही आठवत होते. मुलीला अधिक शिकवली म्हणून भुर्दंड भरणारा व्याहीहि आठवला. लाचारीनें हात जोडून नानासाहेब कुलकर्णी उभे होते. 'एकुलती एक मुलगी, गंमतीनें शिकवली. हल्लीं साऱ्याच मुली शिकतात, ग्रॅज्युएट होतात," ते म्हणत होते. त्यावर तात्यासाहेब हंसले होते. कुत्सितपणें ते म्हणाले होते, 'आजकाल मुली शिकत रहातात, अन मुलं शाळा सोडून नोकऱ्यांच्या मागें धांवतात. ह्या जास्त शिकलेल्या घोडया नोकरीवाल्या कोंकरांना काय शोभणार ? अन् संसाराचं काय कॉलेज का करायचंय् ?...'

व्याह्याव्याह्याचा हा संवाद तात्यासाहेबांना आठवला व ते कांवरेबावरे झाले. आपण केलं तें बरोबर कीं चूक, हें त्यांना कळेना. त्यांनीं नळ बंद करतांच अंतघरांतला स्टोव्हचा आवाज ऐकूं येऊं लागला; अन् त्या-

बरोबर मायलेंकरांचा चाललेला वाद. बायको भांडीं आपटीत, कपबशा वाजवीत सुमनला रागावत होती. नेहमींच्याच कुरबुरी. पण तात्यासाहेबांना स्वैंपाकघरांत पाऊल टाकतांच वाटलं, हिला एवढं रागवायला काय झालं आज ? सुनेचा राग सुमनवर तर नाहीं ना निघत ? सूनबाईनें दुरुत्तरं, अपमान तर केला नाहीं ?—तसं असलं तर आटोपलंच सारं ! घराचं स्वास्थ्य, घराचं वळण बिघडणार असेल तर ती नोकरीच नको ! नोकरीच नको !...

कढत कपाच्या स्पर्शानें त्यांचीं बोटें भाजलीं. दचकून त्यांनीं कप खालीं ठेवला. पोळलेलीं बोटें मांडीवर चोळीत ते स्वैपाकघरभर पाहूं लागले. सुनेनें नौकरी न करून कसं चालेल ? घराचा हा डौल, हा डोलारा कसा सांवरला जाईल ?—त्यांनी हलकेंच बशींत चहा ओतला व फुंकर घालीत पिण्यास सुरवात केली. सुनेच्या पगाराचे चौऱ्याऐंशी रुपये पंधरा आणे त्यांना परत तरतरी आणूं लागले. त्या पैशांचा त्यांनी केव्हांच हिशेब करून ठेवला होता. साठ रुपये मुळीं सरळ वाण्याच्या वाट्याचे होते. सुनेनें आकडेमोडी केली नाहीं तर वाणी खतावणी बंद करील. मग हें स्वैपाकघर कसं भरेल ? हा स्टोव्ह नि ही शेगडी कशी पेटेल ? छे छे—सुनेला स्वैपाकघराबाहेर, संसाराबाहेर ढकललीच पाहिजे. ठरलं म्हणजे ठरलं !—चहा संपवून त्यांनीं कपबशी ठेऊन दिली व धोतराच्या सोग्यानें मिशा पुशीत ते बाहेर आले.

त्यांना सुनेची चाहूल लागली. त्यांनीं वळून पहाण्याआधींच पदर सांवरीत ती बाजूनें निघून गेली. हिरवा पदर सांवरीत, मंगळसूत्र चांचपीत. लग्नांतली हळद अजून गेली नव्हती, लग्नानंतरचीं जागरणं अजून सरलीं नव्हतीं. तात्यासाहेबांना तिच्याबद्दल आपलेपणा, अभिमान वाटला. बाहेर येऊन त्यांनीं घड्याळ पाहिलें. साडेसहाच झाले होते. तसा उशीर झाला नव्हता. तिची उठायची रोजचीच वेळ होती. त्यांना उगाच आतुरता, अस्वस्थता वाटत होती. दीड वर्षापूर्वी मुलगा नोकरीवर जायला निघाला, तेव्हांसुद्धां त्यांना अशी, इतकी अधीरता वाटली नव्हती. आज त्यांना पैशाचा लोभ होता, कीं सुनेची काळजी होती, कीं...

सावकाश सुपारी कातरीत ते फेऱ्या घालीत होते. अखेर त्यांनीं निर्धार

तर केलेला होता. ओळख-पत्र घेऊन ते कस्टमच्या कचेरींत गेले होते. हजार खटपटी करून वरिष्ठाला भेटले होते. ' साहेब, माझी सून आहे. कॉलेजची एक परीक्षा पास झाली आहे...कृपा करून...' आणि परवां नोकरीचा हुकूम आला तेव्हां त्यांचे डोळे भरून आले होते. सुनेच्या पगारानें आतां ओढाताण जरा तरी कमी होईल. डॉक्टरचीं बिलं भागवतां येतील, कापडचोपड खरेदी करतां येईल...

आत्तांही तात्यासाहेबांचे डोळे ओले झाले. ते नकळत आंतघरात जाऊं लागले. सूनबाई तोंड धूत होती. पाण्याचा आवाज, बांगड्यांचा आवाज, अन् मग ओकारीचा आवाज ! तात्यासाहेब थबकले, थरथरले ! त्यांना एकदम सुपारी लागली व ते ठसकूं लागले; दमून खालीं बसले. अंमळशानें उठून परत फेऱ्या घालूं लागले.

छे, असं होऊन भागणार नाहीं. आपलं वय होत चाललं आहे, आपल्याला एकच मुलगा आहे, तरी भलताच मोह, भलतीच हौस आवरली पाहिजे. नातवंडासाठीं तळमळणं शुद्ध वेडेपणाचं आहे. महाप्रयासाने मिळालली मोलाची नोकरी सुनेला सोडावी लागेल व तिच्या बाळंतपणाच्या खर्चाची धोंड आपल्याला सांवरावी लागेल. तात्यासाहेब सुन्न झाले. त्यांतूनहि नातू होणार ह्या कल्पनेनें ते आनंदित होत होते. अन् परत भानावर येऊन खिन्न होत होते.

त्यांच्या एकदम ध्यानांत आलं. सुनेला खांकरून खोकरून तोंड धुवायची संवयच आहे !—ते शांत झाले अन् मग त्यांना स्वतःच्या मनाचं आश्चर्य वाटलं. कांहीं तरी विचार करीत ते उगाचच वेळ काढीत होते. सून चहा घेऊन भाजी चिरायलासुद्धां लागली. अंगधुणं, स्वैंपाकपाणी करून ती आतां कामावर जायला निघेल. आणि त्यांना उगाचच एकएक वाटत होतें. स्वतःशींच हंसण्याचा प्रयत्न करीत त्यांनीं बायकोला साद दिली.

खोचलेला ओंचा खालीं सोडीत व पिठाचे हात झटकीत बायको बाहेर आली. तिच्याकडे हंसून पहात ते म्हणाले, "आज सूनबाई नोकरीवर जाणार आहे. वेळेवर व्हायला हवं जेवायचं !—अन् तिला जातांना डब्यांतून काहीं खायला दे. सहापर्यंत वेळ काढायचा आहे, भूक लागेल—"

" इश्श्य ! जशी कांहीं मला काळजीच नाहीं तिची. शेजारची बबी नाहीं का रेशनिंगच्या नोकरीला जातांना पहात मी ? "

" बबीचं ठीक आहे ग, ती माहेरवाशीण आहे. "

" म्हणजे, मी सुनेला छळतें असंच म्हणायचंय् ना ?—"

" झालं. तुम्हां बायकांपुढें कमाल आहे. अग मला म्हणायचंय् कीं बबी दहा वाजेपर्यंत आरशांत पहात गाणीं म्हणत असते. नुसती पाटावर येते जेवायला नि आंचवून कामावर पळते. सूनबाईला स्वैंपाक आहे—"

" हो, कामाच्या रगाडयांत सांपडली आहे बिचारी ! बबीच्या आई-सारखी मी आतां तिची मनधरणी करीन, चाकरी करीन हो ! कांहीं काळजी नको.—" तिनें डोळयाला पदर लावल्यागत केलं नि पुढें म्हटलं, " नोकरी लागली त्याच दिवशीं आमचा अधिकार सरला तिच्यावरचा. आज गव्हले करायचा बेत केला होता तोहि मी रद्द केला. मंगळगौरी देखील करणार नाहीं. रजा मिळायला हवी ना ! अन्—"

तात्यासाहेब मोठ्यानें हंसू लागले. बायको कां नाराज आहे, हें त्यांना उमगलें. गव्हले गुंडाळून ठेवावे लागणार व मंगळागौरी मनांत पुजाव्या लागणार. साळकायामाळकायांसमोर सुनेचं प्रदर्शन करणं रोज रोज जमणार नाहीं ! त्यांना वाटलं, बायकोला समजावून सांगावं. पण ते नुसतेच हंसत राहिले. मग म्हणाले, " मी जरा बाहेर जाऊन येतों.—"

कनवटीचा रुपाया काढून देत बायको म्हणाली, " पावशेर साबूदाणा आणा. मला उपास आहे उद्यां—"

तात्यासाहेबानी रुपाया घेतला. लगबगीनें आंत जाणाऱ्या बायकोचें त्यांना पुन्हां हंसू आलें. आणि मग हातांतला रुपाया कोटांत ठेवतांना वाटलं, कीं आतां पैसे लागले कीं सुनेकडून घ्यायचे. ' सूनबाई, वाण्याचं बिल द्यायचंय्–पगार झालाय् ना ? ' ' सूनबाई, जरा पांच रुपये दे...' छे छे, पहिल्या तारखेला पुरा पगारच घ्यायचा तिच्याकडून ! सारा एक-हातीं, एकतर्फी कारभार झाला पाहिजे. सगळ्यांची मिळकत एकत्र करून सर्वांनीं सुखासमाधानानं रहायचं.

तात्यासाहेब मोठया खुषींत साबूदाणा आणायला वाण्याकडें निघाले.

जणं आत्तांच सुनेनें त्यांना पगाराचे पंचाऐशीं रुपये देऊन खालीं वांकून नमस्कार केला होता. आणि ते वाण्याचं बिल द्यायला जात होते.

तेवढ्यांत मधुकर समोरून आला. त्यांच्याकडें लक्ष न देतांच तो गुणगुणत घरांत गेला. घरीं चहा पिऊन तो परत कोपऱ्यावरच्या हॉटेलांत चहा ढोसायला जातो, अशी त्यांना शंका होती. ते त्याला बोलले होते; पण त्याचा क्रम चालूच होता. बापाशीं तो धड मोकळेपणानें बोलतही नसे. तात्यासाहेबांना एकदम आठवण आली. दीड वर्षांपूर्वीं नोकरी लागली, तेव्हा त्यांची आजच्याइतकी वाईट स्थिति नव्हती. पण पोरानें पगाराचे पुरे पैसे आणून दिले नाहींत म्हणून त्यांना फार दुःख झालं होतं. ऑफिसच्या लोकाना पहिल्या पगाराचा म्हणून चहा पाजलान् नि येतांना स्वतःकरितां बुटांचा नवा जोड घेऊन आला. तात्यासाहेबांना वाटलं, सूनबाईसुद्धां असंच करणार नाहीं ना ? ऑफिसांतल्या बायांना चहा पाजील ? स्वतःसाठी फॅशनेबल पर्स घेईल ?—घरी फक्त तसिचाळीस रुपये देईल; अन मग वाण्याला आणिक सबबी सांगाव्या लागतील.

त्यांनी दुकानांत शिरून साधूदाणा खरेदी केला. रुपाया टाकीत ते कसेबसें म्हणाले, "पुढच्या महिन्यांत सारं देणं चुकतं करतों—"

दुकानाबाहेर आल्यावर कुठे जावं तें त्यांना कळेना. कुणाकडें चार गप्पा मारायला म्हणून ते बाहेर पडले होते,पण आतां त्यांनाकुणाकडेंच जावंसं वाटेना. जणूं सगळे मित्र आपल्याकडें बघतात, बोटं दाखवतात, असं त्यांना वाटलें. 'काय तात्यासाहेब, तुमच्या सुनेला म्हणे नोकरीला लावलीत ?' कुणी विचारीत आहेसं वाटलं. नोकरीला लावणं म्हणजे धंद्याला लावण्यासारखं महापातक होत जणूं ! ' अहो तुमची सून काल हॉटेलांत दिसली, कुणी बाया त्यांच्या बायकोजवळ कुजबुजत होत्या.तात्यासाहेबांनीं मनांतले विचार आंवरायला म्हणून छत्री उघडली. उन्हं टाळीत ते कडेकडेनें चालूं लागले. कुठल्या तरी रस्त्याला लागले. ती वस्ती अगदीं अपरिचित होती. नवीं घरं, टुमदार ब्लॉक्स. तीं खुराडी पहातांच त्यांना वाटलं, आपली सून नि मुलगा अशींच लहानशा बिऱ्हाडांत रहातील वेगळीं होऊन !

वेगळी ! एकुलता एक मुलगा व सून म्हाताऱ्या आईबापांना व बहिणींना

सोडून वेगळा संसार थाटणार. दोघांच्या नोकऱ्यांचे शंभर व पंचाऐशीं रुपये एकत्र करून मजेंत रहाणार. तात्यासाहेबांना भीति वाटली. रस्त्यावरच ते थबकले. वाहनें जात होतीं. मुलें सायकलवरून वेगानें जात होतीं.–मुली-सुद्धां. त्यांना वाटलं, त्यांत अशक्य काय आहे ? कित्येक तरुण जोडपीं अशीं रहातात आजकाल. तो सान्यांचा पोरगा तर बापाकडून वांटणी मागून वेगळा रहातो आहे व बापाला बिचाऱ्याला कीर्तनं करून जगावं लागतं आहे. तात्यासाहेबांना आपला भविष्यकाळ दिसूं लागला, भयानक दैन्य दिसूं लागलं. नोकरीसाठीं ते म्हातारपणीं वणवणत होते, बायको अंथरुणाला खिळून होती. दोन्ही मुली वाढलेल्या, लग्न झालेल्या...

त्यांना वाटलं, सुमन मोठी झाली कीं तिचं लग्न करायचं नाहीं. तो हुंडा देणं नको नि ती स्थळं शोधणं नको. चारपांच वर्षांत ती मॅट्रिक होईल. लगेच तिला कुठेंतरी चिकटवून देऊं. पांचपन्नास रुपये घरीं आणील. अन् मग आणिक चारपांच वर्षांनीं छोटी कुसुम– दोन्ही पोरी पैसे आणतील, आपल्याजवळ रहातील. तो उनाड पोरटा नको अन ती परक्याची पोर नको !—या नव्या विचाराने ते परत चालूं लागले. ओळखीच्या वस्तीकडे वळूं लागले. चार वर्षांपूर्वी मोठ्या लेकीचं लग्न करून दिलं ह्याची त्यांना हळहळ वाटली व धाकट्या दोघी केव्हां मोठया होतात ह्यासाठीं ते अधीर झाले.

"नमस्ते !—काय, बाजारांत गेला होतां काय ?" नानासाहेब कुलकर्णी हात जोडींत हंसत उभे होते.त्याह्याला पुढ्यांत पहातांच तात्यासाहेब दचकले. साबूदाण्याच्या पुडयाचें सुटलेलें सूत परत गुंतवीत ते भानावर आले. कसेबसे हंसले.

" देवदर्शनाहून आलों—" नानासाहेबच म्हणाले, " रोजचा नेम आहे ना आमचा ? " ते हंसले व व्याह्याच्या हंसण्याची वाट पाहूं लागले. पण तात्यासाहेब गप्प होते. मग नानासाहेबच पुन्हां म्हणाले, " बरी आहे ना विमल ?—खरंच, आजपासून नोकरीवर जाणार आहे नाहीं कां ती ? विसरलोंच होतों मी--"

तात्यासाहेबांनीं वेडयासारखं त्यांच्याकडे पाहिलं. त्यांना वाटलं,

नानासाहेब कुत्सितपणें बोलत आहे, आपण सुनेला लगेच नोकरीवर जुंपली म्हणून. मुलींच्या सासरचे पोकळ वासे जणूं ओळखले त्यांनीं ! अन् मग तात्यासाहेबांच्या लक्षांत आलं कीं नानासाहेबांची स्थिति कांहीं कमी हलाखीची नव्हती. त्यांच्याही घरीं पोरवडा होता व .पैशाचा पुरवठा नव्हता. विमलचा विवाह करून न घेतां त्यांना तिला नोकरीवर पाठवतां आलं असतं. तिच्या पैशांत स्वास्थ्य मिळवतां आलं असतं. तात्यासाहेबांना अपराध्यासारखं झालं. व्याह्याच्या तोंडचा घांस काढून घेतल्यागत वाटलं. एकदां सहाशे रुपये हुंडा तर घेतलाच, अन् वर उलट महिन्याकांठीं आतां पंचाऐशी रुपये व्याज वसूल करून घेणार !

नानासाहेबांना निरोप देऊन ते पुढें निघाले. देवळांत गेले. देवदर्शनानें मन जरा तरी निवेल असं त्यांना वाटलं. देवापुढं हात जोडतांना ते पुटपुटले, ' क्षमा कर, महादेवा ! घरच्या लक्ष्मीला कामाच्या घाण्याला जुंपल्याबद्दल क्षमा कर. अन माझ्या मुलींना मीं तशाच वाढूं देणार नाहीं. त्यांचीं योग्य वेळीं लग्नं करून देईन. त्यांच्या पैशाचा लोभ धरणार नाहीं...'

देवळाबाहेर आल्यावर त्यांना पुन्हा तरतरी आली. सुमनच्या लग्नाचा विचार त्यांच्या मनांत आला. तिला श्रीमंत स्थळ मिळवून देणार होते ते ! अर्थात सासरीं तिनें नोकरी केली तर त्यांना चालणार होतं. त्यांची सून नाहीं का तसं करीत !–तिचं तें कर्तव्यच आहे. तिचंच ते घर आहे, संसार आहे. आपल्या संसाराला हातभार लावणं, आपल्या सौभाग्याचं सातत्य टिकवणं तिचं कर्तव्यच आहे. मग त्यांना वाटलं, कीं सून नि पोरगा वेगळीं रहातील हा विचारही खुळ्यासारखा आहे. किती आज्ञाधारक, समजूतदार, आहे ती ! फार तर तेच तिला पर्स घेऊन देतील, नवऱ्याबरोबर सिनेमाला पाठवतील. अन् मध्या तर अगदीं नेभळा आहे. तो नाहीं असं करायचा. अन करायला लागला तर सूनबाई त्याला अडवील, समजावील !

त्यांनीं खिशांतून घड्याळ काढून पाहिलें, छत्रींतून उन्हाकडें पाहिलें.बराच उशीर झाला होता. दहाची जेवणाची पंगत साधली पाहिजे. नाहींतर सूनबाईला उशीर होईल. ती पाटपाणी करून वाट पहात असेल. वेळेवर ऑफिसला गेली नाहीं, तर साहेब रागावेल. ते झपझप निघाले. घाईनें चालतांना

त्यांना वाटत होतं, नानासाहेबांनीं मुलीला कुड्या घेऊन दिल्या, त्याऐवजीं सायकल दिली असती तर केवढी बहार झाली असती !—ऑफिसला आरामांत तरी जातां आलं असतं तिला...

घराच्या कोपऱ्यावर त्यांना डॉक्टरबाईची पाटी दिसली. नवरा डॉक्टर, बायको डॉक्टर, सूनसुद्धां डॉक्टर ! ती सून नाहीं का बाळंतिणी तपासून सासूसासऱ्याना मदत करीत ?–त्यांना एकदम आपली जुनी मोलकरीण आठवली. मुलाचं लग्न करून दिल्यावर दुसऱ्याच दिवशीं सुनेला भांडीं घांसायला घेऊन आली होती ती. तात्यासाहेबांना तिचं करणं आतां पटलं. सगळीकडे सगळ्याच सुना नोकऱ्या करतात, संसार सांवरतात. त्यांत अपराध्यासारखं, अगतिक झाल्यासारखं वाटायचं काय कारण ?–तात्यासाहेबांना वाटलं, आपण ती बी. ए बी. टी. झालेली सुमार रुपाची मुलगी पाहिली होती. तीच ठरवायला हवी होती ! तिला जास्त पगार मिळाला असता, कायम नोकरी मिळाली असती !...

ते घरीं पोंचले तेव्हां साडेनऊ झाले होतें. कपडे काढून ते अंघोळीला गेले. सुनेनें आज पाणी काढून दिलं नाहीं. आरशापुढें ती पावडर लावीत होती. त्यांचं मन खट्टू झालं. घरकामांत अशी अळंटळं होणार तर ! अन् खर्डेघाशी करायला जायचं म्हणून पावडरी नि फॅशन्स कशाला ? हळूहळूं साऱ्याच सुधारणा व थिल्लरपणा घरांत घोळूं लागणार म्हणायचा ! पर्स, पावडरी, पाचवारी, उष्ट्याखरकट्याऐवजीं ड्राफ्टस् नि फायली. तशा अवतारांतली शेजारची बबी त्यांना आठवली, आणि एकदम वाटलं, नकोच सुनेची पाठवणी. नकोच तें संकटांना निमंत्रण ! पण परत त्यांना पंचाऐशीं रुपये दिसूं लागले, औषधांच्या विचित्र बाटल्या दिसूं लागल्या, मोडींतलीं गिचमिड बिलं दिसूं लागलीं. अखेर आधणाच्या पाण्यांत त्यांनीं विसण घातलं.

जेवणाची पंगत आज वेगळीच होती. ते, मधू ,सूनबाई नि छोटी कुसुम पानावर बसलीं होतीं व बायको सुमनला मदतीला घेऊन वाढीत होती. सूनबाई नवऱ्याबरोबर, सासऱ्याबरोबर प्रथमच जेवायला बसत होती. त्यांच्यासारखा पैसे मिळवणाऱ्यांचा, कर्त्याचा मान तिला मिळाला होता ! तात्यासाहेबांना ह्या बदलाचें भय वाटलं, मजाहि वाटली. ते भरभर जेवूं लागले.

जणूं त्यांनाच कामावर जायचं होतं.

जेवण करून ते बाहेरच्या खोलींत सुपारी खाऊं लागले. त्यांना आतां अधिकाअधिक अस्वस्थ वाटूं लागलं. मोठी मुलगी सासरीं जातांना त्यांना असंच कांहींस वाटलं होतं. त्यांना वाटलं, ऑफिस हें एक नवंच सासर निर्माण झालं आहे आजकाल ! त्या कल्पेनेनें त्यांच्या मनाचा अधिकच गोंधळ उडाला. तो साहेब जणूं सासराच होता. आणि सासूसारखा त्रास देणारा हेडक्लार्क आणि घालूनपाडून बोलणाऱ्या नणंदांसारख्या नोकरीवरच्या-इतर स्त्रिया ! तात्यासाहेबांना वाटलं कीं, सुनेसह आपणहि आज ऑफिस-मध्यें जावं. साहेबाला व हेडक्लार्कला सुनेला सांभाळून घ्यायला सांगावं. कारकून पोरटीं चटारपणा करणार नाहींत व बायका टिंगल करणार नाहींत, अशी कांहींतरी व्यवस्था करावी.

पण ते तसेच सुपारी खात फेऱ्या घालीत होते. ऑफिसांत जाण्याचा वेडेपणा ते कसे करणार? त्यांनीं तिला ऑफिसांत धाडली आहे; ती स्वतःला सांभाळून घेईल आतां. उंबरठ्याआडून आशीर्वाद देणं, उपदेश करणं, एवढंच त्यांचं कर्तव्य होतं. जड हृदयानें त्यानीं टोपी घातली व घरांत डोकावून पाहिलं. सुनेनें उष्टींखरकटीं गोळा केलीं, परत तोंड धुतलें, पदर ठाकठीक केला व ती निघाली.

" देवापुढें पैसासुपारी ठेव--" तात्यासाहेब घोगऱ्या स्वरांत म्हणाले. सूनबाई देवापुढें गेली, हळदकुंकू वाहूं लागली. तात्यासाहेबांनीं तोंड फिर-वलें. बाजूला मधू उभा होता. ते दचकले ! मधू खूष होता कीं खिन्न होता त्यांना कळेना ! काय वाटत असेल त्याला ?...पण अधिक विचार करा-यला वेळ नव्हता. सूनबाई निघाली होती ! " जपून जा, कडेनं जा, बाहेर कांहीं खाऊं नको, फार रात्र करूं नको " सासूबाईच्या उपदेशापुढें तात्या-साहेबांना बोलतां येत नव्हतं. त्यांना बोलवतही नव्हतं.

भरल्या हृदयानें, भरल्या डोळ्यांनीं तात्यासाहेबांनीं तिचा नमस्कार स्विकारला व ते तोंड लपवून रस्त्याकडें पाहूं लागले. मंगळसूत्र चांचपीत, हिरवा पदर सांवरीत सूनबाई घराबाहेर पडली. पाटीवाल्या, रांगोळीवाल्या भाजीवाल्या बायांच्यांत मिसळून दिसेनाशी झाली. ★ ★ ★

# पारू

" कोठून आलां ? "

" ग्रांटरोड. "

" कुठें चाललां ? "

" चिंचपोकळी—"

जागजागीं असा सवालजबाब झाला. पानाच्या ठेल्याशीं बसलेला, फूट-पाथवर दांत कोरीत असलेला, घाईनें ट्राम गांठणारा कुणी सहज सवाल करी. पैशाचे हिशेब डोक्यांत करणारा अगर कुठलासा दोहरा ओठांत घोळ-वणारा रामशरण तितक्याच उडतपणें उत्तर देई " चिंचपोकळी. "

चिंचपोकळी, चिंचपोकळी. आपण कुठल्या पोकळींत चाललो आहोंत हें पारूला अजिबात उमगेना. कुठं आहे अन् किती लांब आहे ते ठिकाण, ह्याचा तिला कांहींच अंदाज येईना. थांबायची, मागं वळून पहायची तर मुळींच सोय नव्हती. रामशरण पुढे चाललेला होता आणि त्याचा साथीदार मागून पाळत ठेवून होता. दोघांच्यामध्यें पारूची ओढाताण होत होती, धिंड निघत होती. गेले दोन दिवस असा घोळ चालला होता. गोरेगांवहून ग्रांट रोड, अन् ग्रांटरोडहून चिंचपोकळी.

' कटे जावत हो ?' कुणीतरी हटकलं व रामशरण थांबला. त्याच्या मुल-खांतला माणूस भेटला होता. भर रस्त्यावरच दोघांच्या गप्पा सुरू झाल्या.. पारूलाहि थांबावं लागलं. त्यांचीं बोलणीं तिला समजेनात; पण आपण कुठ-ल्यातरी कसायाकडें जात नाहीं, इतपत उमज तिला पडूं शकला. तिला तेवढेंच समाधान झालें. आजूबाजूच्या प्रचंड इमारती, खाद्यपेयांनीं भरलेलीं दुकानें,उलटसुलट जाणारीं जनावरासारखीं माणसे व पांखरासारखी पळणारीं-वाहनें पहात ती तशीच अवघडून उभी राहिली. किती वेगळं, विचित्र वाता-वरण होतं सारं ! तें विलक्षण विश्व पाहून तिला वेड्यासारखं झालं. अन् ह्या उरुसांत आपलं काय होणार ह्या भीतीनें तिचे डोळे भरूनहि आले.

तेवढ्यांत मोटर ओरडली व पारूच्या पायाशीं थबकली. पारूनें दचकून उडी मारायचा प्रयत्न केला. रामशरणचा हात हिसडून सैरावरा धांवण्यास

आरंभ केला. उडी मारून माणसांपासून दूर जावं, जंगलांत नाहींसं व्हावं असं तिच्या मनांत चमकून गेलं. पण चौफेर दिसणारीं माणसं नि मोटरी पाहून तर तिला अधिकच बुजल्यासारखं झालं. तीव्र इच्छा असूनहि ती तशीच थबकली. तिचे डोळे परत पाणावले व तोंड कोरडें पडलें. मोठ्यानें टाहो फोडायचंही भान तिच्यांत उरलं नाहीं.

रामशरणनें शिताफीनें तिच्या गळ्यांतल्या दोराचें टोंक पकडलें. एक शिवी हांसडून तो दोर ओढूं लागला. मागच्या माणसानें तिची शेपटी पिरगळली व तिला धक्का दिला. इमारतींच्या खिडक्यांतून कपडे घातलेलीं कोवळी मुलें व मोठी माणसेंही कुतुहलानें म्हशीची ही मजा पहात होती.

पारू मुकाटपणीं चालत होती. मारायला उठलेलीं माणसें व डरकाळ्या फोडणाऱ्या मोटारी यांचें तिला भारी भय वाटे. गोरेगांवहून येतांना अशा असंख्य गाड्या तिला भेडसावून गेल्या होत्या आणि ग्रांटरोडच्या बाजारांत मगरूर माणसांनी तिला छेडलं होतं.एकेका आठवणीनें ती चारी पाय झप झप उचलूं लागली.

कुठल्यातरी कमानीशीं रामशरण थांबला. आपलं ठिकाण आलं हे पारूनें हेरलं. तिला तेवढ्यांत म्हशींचा वास आला. खूपखूप म्हशींचा. त्यांच्या शेणाचा, स्तनांचा, मानेचा. त्यांच्यापुढें टाकलेल्या वैरणीचा. म्हणजे मोठा गोठा होता तर! बाजार नव्हता, नि कसाईखाना तर मुळींच नव्हता. पारूला आनंद झाला. मुक्त कंठानें ती मनापासून ओरडली.

मोठ्या जुनाट कमानींतून तिला आंत ओढीत नेण्यांत आलें. दुतर्फा अंधेरी खुराडीं होतीं. नि त्यात कबुतरांसारखीं माणसं कोंबलीं होतीं. पारूला वाटलं, तीं माणसं मेलेलीं आहेत. पण सुरवंटांसारखीं तीं वळवळत होतीं. खुराडीं ओलांडून पुढें जातांच मोठा गोठा होता. वरून छप्पर घातलेलें, दोन्ही बाजूंनीं गवताच्या गंजी उभारलेल्या, अन मधल्यामोकळ्या जागेंत शेंकडों गलेलठ्ठ म्हशी बांधलेल्या!

पारू पाहातच राहिली. तीं माणसं मेलेलीं वाटलीं, तशा ह्या म्हशी पेंढा भरलेल्या. पण ह्याही सजीव होत्या. संथपणें रवंथ करीत होत्या. कुणाच्याहि डोळ्यांत तेज उरलें नव्हतें, कुणाच्याहि अवयवांत बळ वाटत नव्हतें. पण

तरी त्या म्हशी न मेलेल्याच होत्या. पारूनें एक प्रदक्षिणा घालून पाहिलें. तिला तसें फिरविलें गेलें. कुठें कशी बांधून ठेवायची हें ठरवण्यासाठीं. कोंपऱ्यांतल्या कोरड्या फरशीवर खाटा टाकून पहुडलेल्या इतर भय्ये लोकांना दाखवण्यासाठीं.

रामशरण तिची तारीफ करीत होता. तिच्या शिंगांवर मारलेला सरकारी नंबर दाखवीत होता. तिच्या अंगावर थाप मारीत दुधाचा अंदाज बांधत होता. आणि गुडगुडी ओढणारे व खाटांवर लोळणारे त्याचे सहकारी सारें ऐकून घेत होते, पारूकडे पाहून घेत होते. त्यांची मठ्ठ मुद्रा पाहून पारू बेचैन झाली. गोरेगांवजवळच्या खेड्यांतून तिची प्रथम पाठवणी झाली तेव्हां ओवाळणारी आजी व मुसमुसणारा मुलगा तिला आठवला. ग्रांटरोडच्या बाजारांत तिला जपणारा भोळा भय्या समोर आला. आणि आतां हा रामशरण अन् हे त्याचे साथीदार ! सारे कसायाचे भाईबंद.कुणालाच तिच्या बद्दल कुतूहल नव्हतं, कळवळा नव्हता. पारूनें तोंड फिरवलं व आपल्या सख्यांच्याकडें पाहिले. त्याहि परक्यासारख्या पहात होत्या. कांहीं दिल्लीं-तल्या, कांही सुरतेच्या, एक दोन भुऱ्या. सगळ्या जणु शेणाच्या बनवि-विलेल्या होत्या. ह्यांच्याबरोबर आपण बांधल्या जाणार ह्या विचारानें ती कावरीबावरी झाली. रामशरणकडें कान फडफडवीत काकुळतीनें पाहूं लागली.

रामशरणला काय वाटलें, कोण जाणे. त्यानें बोलणे आंवरलें, विडी विझवली व तो तिला घेऊन निघाला. पारूला पाण्याचा वास आला. नाकपुड्या उडवीत ती आतुरतेनें गेली. लगेच पांच पांवलांवरच एक वासरूं राहील इतका बारीक हौद होता. त्याच्या वरतीच उंचावर पाण्याची प्रचंड टाकी होती. तेथून सांठवलेलें पाणी ह्या हौदांत भरलें होतें. तो उथळ हौद व ते शिळें पाणी पाहतांच पारूची तहान आटली. मोठ्या तलावातलं,वाहा-णाऱ्या प्रवाहांतलं, विहिरींतून बादलींत उपसलेलं ताजं दुधासारखं पाणी कुठें नि हे कोमट, काळें, कचऱ्याचे पाणी कुठें ! हें प्यायचं ? पारूनें तोंड फिरवलें. चिडून हौदाच्या किरकोळ कांठावर शिंगें हापटलीं. कुठेंतरी पाहणारा रामशरण भानावर आला. पारूला परत ओढूं लागला.

तेवढ्यांत प्रचंड आवाज आला. आवाज वाढतच गेला, अन् जवळूनच

समोरूनच अवाढव्य अजगरासारखी रंगीत गाडी वेगानें आली. उडणारीं पांखरें आणिक वर गेलीं व जमिनीचे गोटे आजूबाजूला उडाले. विजेसारखी गाडी गेली. असंख्य मेलेल्या माणसांना घेऊन अदृश्य झाली !

पारू चारी खुरांवर उधळली. भीतीनें तिचा जबडा बंद झाला व आंतडीं आकुंचित झालीं. कुठेंतरी पळून जावं ह्या भावनेनें ती धडपडूं लागली. पण रामशरणनें तिच्या गळ्यांतला दोर आंखडून धरला. एकजण आला व तिची मान मोडूं लागला. तिच्या गळ्याभोंवतीं आणिक एक दोरखंड टाकला गेला कोपऱ्यांत लोळणारे भय्ये मोठ्यानें हंसले. त्यांचें उपरोधिक हास्य पारूला जाणवलें. असें आवाज आणि असें अजगर वारंवार येणार तर ! शहारे येऊन, शरमून ती धन्यामागें गेली.

पारूला गोठ्याच्या ओट्यावर चढवलें गेलें व रिकाम्या झालेल्या एका म्हशीच्या जागीं जखडण्यांत आलें. रिकाम्या जागीं ! खरं म्हणजे, शंभर-जणींच्या जागेंत आधींच अडीचशें बांधल्या होत्या. एवढीशी जागाहि वायां घालविलेली नव्हती. अन् जास्त जागाहि नव्हती. दोन्ही दिशांना उंच व भक्कम भिंती होत्या व गोठ्यापुढून गाड्यांचा लोहमार्ग पसरला होता. गोठ्या-वर ठेंगणं छप्पर होतं व त्याच्या पोटातच भय्ये लोकांच्या झोपायच्या खाटा लटकावल्या होत्या. सारं कसं एकमेकावर रचून ठेवलं होतं. पारूला कोंड-ल्यासारखं झालं. समोरून धावणाऱ्या गाड्या अंगावर येताहेत, खाटा डोक्यांत पडताहेत, असं तिला वाटलं. तिचा जीव कासावीस झाला. जंगली जनाव-रांच्या जबड्यांत अगर खाटकाच्या सुऱ्याखालीं मान देणं परवडलं, पण ह्या ठिकाणीं जरा वेळ उभं राहणंहि अशक्य ! भयंकर भीतीनें तिचे खुर लट-लटले. पाय दुमडून ती दपकन् खालीं बसली.

त्याबरोबर तिच्या दोन्ही बाजूंच्या दिल्लीवाल्या उठून उभ्या राहिल्या. पारूनें पाहिलें, तो त्या शेजारणींच्या पलीकडच्या म्हशी बसूं लागल्या. ही काय कवाईत आहे, कळेना तिला !–हळूहळू तिच्या ध्यानांत आलें. इतकी थोडी जागा होती कीं साऱ्यांनीं एकदम उभं राहणं अशक्य होतं. एक उभी आहे तोवर तिच्या शेजारणीनें जवळच्या रिकाम्या जागेंत बसून घ्यायला हवं. असं आलटून पालटून बसणं, उभं राहणंच भाग होतं !

पारूचं सर्वांग शहारलं. ती तरारून उठली ! शेजारणींचीं शरीरें तिला घासटूं लागलीं. डोळयांत प्राण आणून तिनें दोघींच्याकडें पाहिलें. पण त्यांच्यांत त्राणच उरलें नव्हतें. भिंतीसारख्या त्या खडया होत्या. टाटी सहन करीत, दुःख सहन करीत. त्यांच्या मधाळ डोळयांची माती झाली होती. शिंगांतली तडफ मोडून गेली होती. पारूला त्यांची भीतीच वाटली. ह्यांच्याबरोबर आपण रहाणार, ह्यांच्यासारख्या आपण होणार, ह्या विचारानें ती सुन्न झाली !

रामशरणनें पुढ्यांत आंबोण आणून ठेवलें. पारूला तेवढेंच सुटल्यासारखें वाटलें. खुपसा भुसा व सरकी खाल्ल्याबरोबर तिला तरतरी आली. दाढा हलवीत, लाळ गोळा करीत तिनें केव्हातरी डोळे मिटून घेतले.

...तिच्या मिटल्या डोळयांपुढें प्रचंड पहाड उभे राहिले. सर्वत्र मोठी झाडी नि हिरवीगार कुरणें होतीं. डोंगरापलीकडून उन्हाचे पट्टे येत होते. डोंगरावरून सोसाटयाचा वारा वहात होता. पायथ्याच्या पाणथळात पारु डुंबत होती. पाण्याच्या लाटा तिच्या नाकपुडयांना, कानांच्या फडयांना गुदगुल्या करीत होत्या. पाण्याबाहेर मान काढून मग ती तरंगूं लागली. मध्येच चारी खूर रोवून चिखल उडवत सुटली. तिच्या पाठीवर पांढरा बगळा होता. अन तिला बेडकांचे आवाज ऐकूं येत होते. काळी कातडी पुरी रापली तशी ती उठली. हिरव्यागार गवतांत रानराणीसारखी हिंडूं लागली. तिच्या मागें बगळे व कावळे धांवत होते. तिच्यापुढें सरडे व नाकतोडे उडया घेत होते. शेपटी उंचावीत, कान फडफडावीत ती चारी पायांवर उडया घेत होती. मध्येंच थांबून कोंवळ्या गवताचे कोंब खुडीत होती. संथपणें एका जागीं उभं राहून रवंथ करण्यांत तर कमालीचं सुख होतं ! तिची मान खाजत होती, जठरं गरम होत होतीं नि ओटी ओथंबून आली होती. कुठूनतरी तिचं पोर झेप घेत आलं अन् आंचळांशीं झोंबूं लागलं. दूर क्षितिजावरून गुराखी आला. गळयांतल्या घंटांचा आवाज करीत तिच्या सख्या आल्या. सारं सुख सहन न होऊन तिनें डोळे मिटून घेतले....

पारूनें दचकून डोळे उघडले. आपण कुठे उभ्या आहोंत तें तिला कळेचना ! तिनें कान फडफडावले, शेपटी उडवली...छे ! पायांत पोर लुडबुडत

नव्हतें, गळ्यांत घंटा डुलत नव्हती. समोर डोंगरांच्या रांगा तर मुळींच नव्हत्या ! मग तिच्या ध्यानांत सारी स्थिति आली. दोन्ही बाजूंना दिल्ली-वाल्या दाटी करीत होत्या व डोक्यावर गुराखी गुडगुडी ओढीत होते. समोरच्या लोहमार्गावरून नागिणी सळसळूं लागल्या. अन् मग त्याहि पलिकडें असलेल्या काळ्या, वाटोळ्या, प्रचंड लोखंडी हौदांतून धूर निघूं लागला. धुराच्या अनेक सर्पाकृती झाल्या, आकाशांतील म्हशीशी टकरा देऊं लागल्या. जिकडे तिकडे विचित्र अंधार पसरत होता. गुहेंतून लुकलुकणाऱ्या डोळ्यांसारख्या दिसणाऱ्या दिव्यांनी अधिकच भेसूरता भासत होती.

पारूची जीभ आंत ओढली गेली व बुबुळं बाहेर डोकावूं लागलीं. सुटायची, पळून जाण्याची तिला आठवणहि उरली नाहीं.

तेवढ्यांत तिचा दोर सैल झाला व तिला सोडण्यांत आलें. तिचं उदास मन उल्हसित झालं. तिच्या बरोबरीच्या सहा:जणींना सोडून गोठ्याबाहेर आणलं. पारुला वाटलं, ह्या नव्या मैत्रिणींना शिंगानें गुदगुल्या कराव्या. पण साऱ्याजणी शांत होत्या. ती दचकली व त्यांच्यासारखी दीनवाणी चालूं लागली. पण फार चालावं लागलं नाहीं. मधाचच्याच हौदाशीं साऱ्या जणींना आणलं, पाणी पाजलं व परत फिरवलं. त्या त्या जागीं जखडून ठेवलं.

एवढीच सहल, एवढीच मोकळीक ! घंटा वाजवीत गवतातून मनमुराद हिंडणं नाहीं. वरून ढकलत उतरायचं नाहीं कीं उन्हं अंगावर घेत मख्खपणें बसून राहायचं नाहीं. गोठ्यांतल्या खोड्यांत पेंढा भरल्यागत उभी राहत पारु अश्रू गाळूं लागली. कुणाच्याच गळ्यात घंटा नव्हती. आगगाडीचा, मोटारींचा, माणसांचा ‘कर्कश किरकिराट अखंड चालूं होता; त्यांत घंटेचा घुमणारा गोड नाद कुठें येणार ? त्या आवाजासाठीं तिचा जीव आतुर झाला.

सगळ्यांचे गळे भुंडे होतेच, पण कुणाच्या पुठ्यावर मालकाच्या काठीचा रट्टासुद्धां उठला नव्हता. भाडोत्री भय्ये गुडगुडी ओढीत होते व यंत्रासारखीं गुरं रवंथ करीत होतीं. पारु हैराण झाली, हाय घेऊं लागली. दूरदूरचे डोंगरपट्टे पहावे अशी तिला तीव्र ओढ लागली. पाण्यापासची

मऊ माती हुंगावी, गवतांच्या ताटांवर नाचणारे तुडतुडे उडवावे, मान मोडून मागें वासरांकडे पाहावं—सारं संपलं होतं. दृष्टीसमोरचे धुराचे लोट, विजेसारखीं जाणारीं वाहनं व म्हशींच्या रांगा ह्याविना कांहीं उरलं नव्हतं.

केव्हांतरी तिला कळलं कीं पुरी रात्र झाली आहे. डोक्यावर टांगलेल्या खांटावर ते खाटीक घोरत होते म्हणून रात्र म्हणायची. बाकी अनेक आवाज ऐकूं येत होते. आणि जागजागीं दिवे पेटलेले होतेच. पारूला पूर्वीच्या रात्रीं स्मरल्या. खेडयांतल्या त्या गोठयांत रात्रींसुद्धां केवढी गंमत असे. रातकिडयांचा आवाज, फांद्यापानांची सळसळ, एखादीच्या शिंगाची खुड-बुड ! अन् इथें सावलीसारखं उभं राहायचं. आवाज ऐकत, उजेड पहात. अंधार नि उजेड, मालक नि मैत्रिणी, गोठा नि गाडया—कशालाच कांहीं अर्थ नव्हता !

पारू शहारली. तिला वाटलं, अखेरचं अवसान आणावं, दातांनीं दोर चावून टाकावे नि ह्या खोडयांतून सुटावं. समोरच्या लोहमार्गावर मरून जावं, धुरांत पोहत जावं, कुठेंतरी चौखूर उधळून जावं ! तिची तगमग झाली, तडफड झाली. पण सारं स्वस्थ, तटस्थ होतं. इतक्या म्हशी अस-तांना, एवढा मोठा कळप असतांना...तिनें शिंगें हापटून, शेपटी उडवून शेजारणीला इशारा केला. नाकपुडया फेंदारीत भानावर आणायचा यत्न केला. पण शेजारणींत जेमतेम जीव उरला होता. डोळ्यांत आसवं आणून ती पारूकडें पाहूं लागली–पारू, पोरी, आतां तुझी सुटका नाहीं. आठ शेर दुधाखालीं तुझी कास आली कीं तुला कसायाकडे धाडतील. तोंवर इथेंच राहणं भाग आहे. उगाच दंगा करूं नकोस. दिवसांतून दोनदां पांच पावलां-वर पाणी प्यायला जायचं, दिवसांतून दोनदां पांच शेरपर्यंत दूध द्यायचं ! बाकी भानगडींत पडूं नको. भरपूर खायला मिळतं तें भाग्य समज. अन् समोरून सारखा माणसांच्या प्रेतांचा पोळा निघतो त्यापेक्षां आपण खूप सुखी आहोंत—

पारूच्या अंगाची आग झाली. आपली अशी अवस्था होणार हें ऐकून ती वेडीपिशी झाली. मागल्या डाव्या खुरानें खांकेंत खाजवीत ती दुसऱ्या

शेजारणीकडें पाहूं लागली. ती तरी धीर देईल, मार्ग दाखवील! पण तिच्या खुरांचे लांकडी ठोकळे झाले होते आणि मुंडकें मातीचें वाटत होतें. पारूनें छेडतांच ती जेमतेम भानावर आली. उसासे सोडूं लागली.—मालक बोटांनी दूध काढतो हें काय कमी? कांहीं ठिकाणीं म्हणे कांचेची चरबी कांसेवर चिकटवतात. आंचळांतून रक्त निघतं!—

पारू आतां अनावर झाली. शेपटी उडवूं लागली, शिंगें वाजवूं लागली. खुरांनीं जमीन घासूं लागली. पण गोठ्यांतल्या साऱ्याजणीं हावभाव करायचं, विचार प्रकट करायचं विसरून गेल्या होत्या. आणि पारू मात्र आव्हान देत होती, आक्रोश करीत होती!

अखेर ती दमली, थाबली. तिचं अरण्यरुदन कुणाच्याच कानांवर जाईना. साऱ्या मख्खपणें रवंथ करीत होत्या. पारूच्या धडपडीपेक्षां त्या यंत्रांचें रवंथ अधिक स्पष्ट सुरू होते, संपणारें नव्हतें! पारूच्या मानेला रग लागली व खुरांच्या बेचकांतून रक्त निघालें. तिला वाटलें, आपल्या आचळांतूनच रक्त येत आहे. आपल्या पाठीचं कातडं सोलून त्याच्या वहाणा वाजवीत भय्ये लोक घोरत आहेत. आपलं मानेपासून मुंडकं काढून तें मोटारीला चिकटलें आहे... मग आपल्याला काय होतंय्, काय हवंय् हेंहि तिला हळूहळूं कळेनासें झाले!

उत्तररात्रीं वर झोंपलेले भय्ये पिंजऱ्यांतल्या पंख तोडलेल्या पोपटांसारखे खालीं उतरले. जखमेवर चोंची मारणाऱ्या कावळ्यांसारखे आंचळं ओरबाडूं लागले. वासराच्या अंधुक आठवणीनें, वनश्रीच्या अस्पष्ट आठवणीनें पारूनें हंबरडा फोडला. पण अखेरचाच. त्या आक्रोशांत तिचा आत्मा उडून गेला...

मग न थांबणाऱ्या आगगाड्यांसारखे दिवस जाऊं लागले. दोनदां पाणी प्यायचं, दोनदा दूध द्यायचं! चार खूर, चार जठरं व चार आचळं ह्यांखेरीज काहींच उरलं नाहीं. लवकरच तेंही आटोपलं. हलणारा जबडा व भरणारी ओटी ह्यांचं सांधलेलं, बनलेलं एक यंत्र तयार झालं. समोरच्या गॅसच्या धुराड्यापुढें व विजेच्या आगगाड्यांपुढें अखंडपणें काम करीत राहिलं.

★ ★ ★

# प्रसाद्

आडमार्गावरील अंधेऱ्या घरांत सजवलेलें प्रसूतिगृह, आडमार्गाला असलें तरी बरेंच भरभराटींत चाललें होतें ! तेवढ्याशा जागेंत भेटायला येणाऱ्यासाठीं बाहेरचा व्हरांडा, औषधांचा चिंचोळा बोळ, रोगी तपासण्याचें दालन, बाळंतिणींचा दिवाणखाना, अन् खास रोग्यांची छोटी खोली. तीन मोलकरणी, दोन सुईणी अन् एक हरकाम्या सुद्धा अपुरा पडे. पोक्त व प्रशस्त डॉक्टरबाई पहांटेपासून अपरात्रीपर्यंत सोडवणुकींत गुंतलेल्या असत.

आत्तां व्हरांड्यांत भेटायला आलेल्यांची वर्दळ होतीच. बरेचसे पुरुष बाहेरच अवघडून बसले होते. दोन म्हातारे सारखे खोकत होते व बडबडत होते. एका कारकुनाला जुळीं होतील अशी भीति होती नि त्याचे दोन्ही डोळे फिरत होते. एका वेश्येचा मामा सिगारेटचा धूर फेकीत सुखस्वप्नांत सुस्तावला होता. एक कोवळा नवरा केंविलवाणा चेहरा करून बसला होता.

तो त्या गर्दींतच होता. अस्वस्थपणें हात चोळीत, कोपऱ्यांत उभा. चेहरा काळवंडून गेला होता व हातापायांना पुन्हां पुन्हां घाम फुटत होता. आजूबाजूचे 'पिते' त्याला पाहवत नव्हते. ते त्याच्याकडे पाहत, ओळख करून घ्यायच्या बेतानें हास्य करीत, अन् त्याला अगदींच मेल्यासारखें होई. त्यांचें हास्य, त्यांची हूरहूर त्याला त्रासदायक वाटे. आंतून मुलांचा रडण्याचा आवाज ऐकला कीं त्याच्या पोटांत सुया टोचल्यागत होई. पुन्हां पुन्हां तो शरमेनें चौफेर पाही, कोपऱ्यांत अंग चोरून उभा राही. औषधांचा वास, सुईणींच्या फेऱ्या, दुधाच्या बाटल्या, दुपट्यांच्या घड्या, चिमटे, कापूस...कुठल्या कोंदट, भयाण, वातावरणांत त्याला यावं लागलं होतं !

एक म्हातारी सुईण त्याच्यापुढून गेली, थबकली, व हंसून म्हणाली, "थांबा हं !—आतां भेटतीलच डॉक्टर !" त्याला जरा टवटवी आली. पण दुसऱ्या क्षणीं तो थिजून गेला. त्या सुईणीचें तें मुद्दाम दाखवलेलें अगत्य

अन् हेतुपूर्वक केलेलें हास्य पाहून तो पांढरा फटक पडला. केवढी विटंबना ! काय समजली असेल ही थेरडी आपल्याला...

त्यानें स्वतःला सांवरून घेतलें. सारं भोगलंच पाहिजे आतां. अन् आतां थोडक्यावर आलं होतं ! गेला महिनाभर होणारा मनस्ताप अखेर संपणार होता. सगळी व्यवस्था पूर्ण झाली होती. फक्त एक रात्र व एक दिवस उलटला कीं...मग...मग ?

पुन्हां तो काळानिळा पडला. संध्याकाळच्या उदास सांवल्या अधिकच झांकळून गेल्या. पावसाची पिरपिर पूर्ववत सुरू झाली. रस्त्यावरून एक प्रेतयात्रा हलकेच गेली. कुठून तरी टळण घालणारं गाणं ऐकूं येत होतंच. आयुष्याचा सारा गुंता त्याच्यापुढें घोटाळत होता.आणि तिची मूर्ति त्यातून तरळत होती.

किती निष्पाप, निर्व्याज ! पोपटाचा पिंजरा धूत असताना, चहाचा पेला पुढें करतांना, खिडकीतून चिठी भिरकावितांना...तिचीं अनेक रूपें त्याला दिसूं लागलीं. किती विलक्षण प्रेम करीत होती ती ! आणि त्या प्रीतिपायीं केवढीं संकटें सोशीत होती ! बापानें फाडून काढलेली, नात-लगांनीं वाळीत टाकलेली, चोरून भेट घेऊन रडणारी...तिच्या अनेक आकृति त्याला दिसूं लागल्या. केवढं दिव्य प्रेम होतं तिचं...

"केव्हां लग्न झालं-?"-शेजारच्या कोवळ्या तरुणानें विचारलें. तो भानावर येऊन भयंकर दचकला. लग्न ! लग्न ! धरणी दुभंगली तर बरं होईल असें त्याला वाटलें. तो तरुण संसाराच्या ओझ्यानें वांकला होता, तरी संसारी होता, ह्या गोष्टीचा त्याला हेवा वाटला. तेवढ्यांत बाजूचा कारकून उद्गारला, "पहिलीच खेप वाटतं ? आमची ही तिसरी पाळी ! अन् जुळं होईल म्हणतात. त्यापेक्षां आधींच—"विलक्षण चेहरा करून त्यानें कारकुनाकडें पाहिलें ! किती सहज,सरळ सांगत होता तो ! त्यानें आपली दृष्टि दूर केली. मग वेश्येच्या मामानें सोडलेल्या सिगरेटचीं वलयें दूर करीत तो उदासवाणा उभा राहिला !

त्याला वाटलं, एकदम इथून पळून जावं ! दूर, एकांतांत, जगाच्याही बाहेर !...

पण अपराधी मुद्रा करून तो कोपऱ्यांतल्या स्टुलावर टेकला. कुठें नि कसा जाणार, निर्व्याज नि निस्वार्थी प्रेमाच्या थापा अंगाशीं आल्यावर ! तिला फसवून, तिला अडकवून, स्वतः सुटूं पाहाणार ? दारिद्र्याची, जात-पाताची, भावी परिणामांची पर्वा न करता केलेल्या. प्रेमाचं पोतेरें झालं म्हणून ? -किती भेकड, हलकट...

पुन्हां घाम, पुन्हां शरम, पुन्हां हृदयाचा चोळामेळा. तो स्टुलावरून उठला नि तेथल्या तेथें फेऱ्या घालूं लागला. हा ताण आतां सहन होत नव्हता. एकदां लवकर उरकलं कीं ह्यांतून सुटलों ! ह्या भावनेचीहि त्याला भीति वाटली. कशांतून सुटलों ?...तो वेडा होत होता अन स्वतःला समजावीतहि होता.

मध्येंच तो थबकला नि त्यानें खिसा चांचपून पाहिला. शंभराची नोट सुरक्षित होती. शेक्सपीअरचे ग्रंथ, बोटांतली अंगठी, एकुलती एक आराम-खुर्ची, असेल नसेल ते सारं मौल्यवान विकून शभर रुपयाची उभारणी केली होती. सारंच मौल्यवान विकलं होतं. प्रेम, शील, माणुसकी ! त्याला उभं राहणंही अशक्य झालें. अंगांत ताप चढलासं वाटलें. पुन्हां घाम, पुन्हां शरम...

तेवढ्यांत समोरून डॉक्टर आल्या. त्याचं काळीज खालींवर होऊं लागलं. डॉक्टरनी त्याला अभिवादन केलं. त्याला खेटरं मारल्यागत वाटलं!

डॉक्टर म्हणाल्या, " अजून आल्या नाहींत त्या ? -"

तो चांचरत म्हणाला, " येतील आतां !-मी मुद्दाम पुढें आलोंय्-"

" असं-असं ! मी आल्यें. तुम्ही तिकडे बसा, त्या बाकावर—"

तो औषधांच्या कपाटामागें गेला, व कसाबसा बसला. व्हरांड्यातले लोक डॉक्टरभोंवतीं गोळा झाले, आपल्या कायदेशीर सुनांचं, बायकांचं कुशल विचारूं लागले.

त्याला ब्रम्हांड आठवलं. तो कोवळा पोरगा, किरकोळ कारकून, छटेल इसम, ढसकणारे म्हातारे, ह्या सर्वांहून तो किती वेगळा होता, वरचा होता! पण काय दुर्दैव वाट्याला आलं होतं !- परोपरीचं प्रेम करून अखेर सारं चोरून...आणि ह्या लोकांचीं लग्नं, त्यांचे संसार, त्यांची संतति काय मोठी

सोन्याची होती ? केवळ बुरसलेल्या बुद्रुकांनीं माना डोलावल्या, अन् कागदावरच्या कायद्यांनीं खुणा केल्या म्हणून ह्यांचा वंश वाढायचा !... त्यानें तोंड झाकून घेतलं ! साऱ्या जगाची विलक्षण किळस आली. स्वतःच्या दारिद्र्याची, दुबळ्या मनाची, चीड आली. हळुंहळू तो हुंदके देऊं लागला !

अपयश नि अधःपात ह्यांच्या गर्तेत त्याच्या हृदयाचे अणूरेणूएवढे तुकडे कितीवेळ तरी होत राहिले !–

मग तो भानावर आला...कुणीतरी हुंदके देत होतं. तो दचकून पाहूं लागला. कुणी मेलं होतं. बाळंतिण ? बाळ ?–त्याला अगदीं अपराध्यासारखं वाटलं...रस्त्यावरून पोलीसची गाडी गेलेली दिसली. अन् भीतीनें त्याची वाचाच बसली. समोरून स्ट्रेचरवरून पांघरुणांत लपेटलेली एक बाई कुठून कुठें नेली. अन् तो आ वसून पाहूं लागला. समोरची सुरी उचलून स्वतःची मान चिरून टाकावी असं त्याला वाटलं.

अमळशानें तो परत सांवरूं लागला. आतां थोडा धीर धरायला हवा होता. एवढं सुरळीत जमलं हेच नशीब होतं. नाहीं तर केवढं अरिष्ट कोसळलं असतं ! उद्यां संध्याकाळीं जिकडचं तिकडे होईल. जसं कांहीं काहीच घडलं नाहीं.

टॉवेलला हात पुशीत डॉक्टर त्याच्या पुढ्यांत आल्या. नरबलीसारखा खालीं मान घालून तो लटपटत उभा राहिला.

डॉक्टर समजावणीच्या स्वरांत म्हणाल्या, "घाबरायचं कारण नाहीं. अगदी सोप असतं सारं–उद्यां संध्याकाळीं परत जाऊं शकतील त्या—"

त्यानें खिशांतून नोट बाहेर काढली व पुढें करीत म्हटलं, "एवढंच देऊं शकतों मी–"

"हरकत नाहीं. तुम्ही ओळख आणलीत त्यावरून मी फुकटही काम केलं असतं—"

त्यानें मान खालीं घातली.

"काय करतां तुम्ही ?–अन् लग्न कां नाहीं केलंत?––"

त्यानें भकास चेहेरा करून वर पाहिलं. कधींच लग्न करणं अशक्य आहे हें त्याना जर कळलं तर कदाचित्--तो घाईनें म्हणाला,

" पुढल्या महिन्यांत—"

" छान छान !-हें असं फार वाईट ! फारच वाढलं आहे हें जिकडे तिकडे--"

आपण तसें नाहीं हें सांगतां आलें असतें तर फार बरें झालें असतें, असें त्याला वाटलं ! किती समंजसपणें, सुसंस्कृतपणें, तो वागला होता. पण ह्या गप्पांत काय अर्थ होता ? अेवढ्या विश्वासानें ती त्याच्याकडें आली होती; आणि त्यानें तिला उलट वासनेचा अहेर केला होता--

" मुलींची स्थिति मोठी वाईट होते-" डॉक्टरानीं समारोप केला. त्याचें काळीज रक्तानें भरून गेलं. कावराबावरा होऊन तो म्हणाला,

" जरा काळजी घ्या; नाजूक आहे ती -"

" तुम्ही अगदीं भिऊं नका. सारं उरकलं आहे असं समजा नि सिनेमाला जा ! इकडे येऊंही नका. एकदम मांडवांतच भेटा आपल्या मैत्रिणीला-"

त्यांचे पाय लटपटूं लागले अन् डोकें गरगरूं लागलें. केवढं गलिच्छ स्वरूप आलं होतं साऱ्या गोष्टीला ! केवढे धिंडवडे उडाले होते ! अरेरे--

" तुम्हांला घेरी येते काय ?—स्वस्थ बसा थोडा वेळ, नि मग जा ! -आणि हें मिक्श्चर घ्या !-जरा बरं वाटेल ह्यानें—"

डॉक्टरनीं एक डोस त्याच्यापुढें केला व त्या निघून गेल्या.

क्षणमात्र त्याला हायसं वाटलं. सगळं संपणार आतां ! संपलंच जवळ-जवळ. त्याच्या मनावरचं दडपण उडून गेलं. अगदीं हलकं वाटलं त्याला ! एका भयंकर संकटांतून तो सुटला होता. महिना दीड महिनाभर जे विलक्षण क्लेश भोगले होते ते आटोपले आतां ! त्याचं वजन कमी झालं होतं, चेहेऱ्याकडील आकर्षक भाव वाळून गेला होता. मनांतली सारी आशा नाहींशी झाली होती. पश्चात्तापानें तो अंतर्बाह्य पोळून निघाला होता. त्याच्या आयुष्यांत कायमचा अंधार होणारसं वाटत होतं...पण अखेर उजाडणार ! आशेची काळरात्र आंवरली कीं पुन्हां पूर्ववत् प्रवास सुरू...

हुषारी आणण्यासाठीं तो औषधाकडें पाहूं लागला. औषधानें त्याला तर-तरी येईल. ऑपरेशननें तिची सुटका होईल. अन् मग...मग ??—

सारं जग त्याच्या पुढून गर्कन् फिरलं. स्वतःला सावरण्याच्या भरांत समोरचं औषध सांडून गेलं...मग ?–उद्यां ?–चूक सुधारली गेली, संकटां-तून सुटका झाली, पण अखेर साधलं काय ? लग्नाची कधींच शक्यता नाहीं. संसाराची, सहप्रवासाची, यत्किंचितही आशा नाही. कसलंही साहस केलं तरी तिचा जमदग्नि बाप ते पुरून उरेल ! सारा जन्म विरहांत, व्यथेत घालवायचंच नाशीबीं आहे......

छे, कुठलीच शक्यता नाहीं ! फक्त प्रेमाच्या पांघरुणाखालीं हें पाप करणंच शक्य आहे !

तो असहायपणें बांकावर बसला. अंग तापानें फणफणल होतं. दृष्टीं-समोर अंधार होत होता. ताण संपल्यानंतर मोकळं झालेलं मन मोहरून येत नव्हतं. उठायचं अवसानच उरलं नव्हतं ! आशेचे, आनंदाचे, उल्हा-साचे विचार घोळवायची शक्तीच नष्ट झाली होती...

तो विव्हळूं लागला. काय करायचं ? कशाला जगायचं ? प्रीतिच्या ज्या सुखद स्मृतीवर एकाकी आयुष्य घालवायचं, त्याही आतां विटाळून गेल्या. तिची नुसती आठवण झाली तरी आतां शरमेनें तोंड काळवंडून जाईल. तिची एकांतात भेट झाली तर तिची सांवलीसुद्धा आपलं सुतक पाळील ! कसं जगायचं ? कशाच्या आधारावर राहायचं ? पोटांतलं पाप दूर करता आलं. पण हें हृदयांतलं पाप कसं काढून टाकायचं ?—पाप ! अन् खूनही. पोटच्या पोराचा खून !

त्याचं हृदय चिरून निघालं. विद्ध होऊन तो चौफेर पाहूं लागला. उलट सुलट सांवल्या एकमेकांत मिसळत होत्या. औषधांचे कुबट वास घोंघावत होते. पाळणे वेगानं फिरत होते, अन् सुईणीच्या फेऱ्या संपत नव्हत्या. ती थेरडी सुईण तेवढ्यांत थांबून हंसत होती...सुवासिनी वित होत्या, लग्न लागली जात होती. सारे सुखी होते, सदाचारी होते...

रक्तवाहिन्या फुटणार, मज्जातंतू तुटणार, असं त्याला वाटूं लागलं ! खरं म्हणजे संकट संपल्यावरचा सुटकेचा श्वास त्याला सोडायचा होता. पण

आतां तर धड श्वासोच्छ्वासहि घेतां येईना. सारं आयुष्यच ओगळ झालं. जीवनांतलं संगीतच घसरत खालच्या सप्तकाशीं, खालच्या सुराशीं संपू लागलं.

अखेरचं अवसान आणून उठायचा त्यानें यत्न केला. पण मुंग्यांनीं भरलेले हातपाय व वेदनांनीं भरलेलं डोकं कसं हालवायचं? समोरचं तरतरी आणणारं औषध तर वाहून गेलं होतं. अन उठायचं म्हणजे काय करायचं? कुठें पाहायचं, कुठें जायचं? कसली वाट पाहायची, कसल्या स्मृति संभाळायच्या?

फुटणाऱ्या हृदयानें, फाटणाऱ्या नजरेनें, तो इकडे तिकडे पाहूं लागला. ती यायची वेळ झाली होती. ती यायच्या आंत नाहींसं होणं अवश्य होतं. ह्या मुर्दाड चेहेऱ्यानें तिचे पोळलेले डोळे कसे पाहायचे?—तिची जखमी नजर, तिचं हताश हृदय स्मरतांच तो अगदीं हतबल झाला...

अन् अचानक, एकाएकी, तो आकांत करीत उठला. प्रेम, पाप, पोर...! औषधांचं कपाट त्याने आवेगानें उघडलं. अनेक औषधें ओळीनें मांडलीं होती. तरतरी यायला, भूल द्यायला, वेदना कमी व्हायला, विषारी... विषाच्या बाटलीला त्यानें चटकन् कवटाळलें.

...क्षण दोन क्षण तो वेदनांनीं व्याकुळ झाला. हृदय दुःखानें जळत होते, अन् घशात बाटलींतले घोट उतरत होते...मग तो तेथून निघाला. ती यायच्या आत हे काळें तोंड लपवायचा हवं होतं. तो खालच्या मानेनें, मागच्या दारानें, दूर झाला...

* * *

ती आली मागील दारानें, दबकत दबकतच! मंगळागौरीचं मैत्रिणीकडे जायला म्हणून दीड दिवसाची परवानगी घेऊन व चाफ्याची वेणी नि सोन्याचे दागिने घालून घरांतून निघाली, ती तडक प्रसूतिगृहांत आली! घामानें व पावसानें तिचे केस, कपाळ, कोरी साडी भिजून गेली होती. भीतीनें व काळजीनें तिचं हृदय खालीवर होत होतं.

प्रसूतिगृहांतलें वातावरण पाहून ती अधिकच उन्मळून गेली. दिवे लागणीची वेळ झाली होती. संध्याकाळचीं औषधं, संध्याकाळचीं दुधं, संध्या-

काळचीं जेवणं ह्यांत सुईणी व मोलकरणी गुंतल्या होत्या. पलंगावरून पहिलटकरणी, पोक्त बाया, अष्टपुत्रा सौभाग्यवती स्त्रिया बसल्या होत्या, निजल्या होत्या...

म्हाताऱ्या सुईणीनें तिला पाहिलें, अन् हंसून औषधाच्या कपाटाआड तिला बसवलं. त्या म्हातारीचं तिला भारी भय वाटलं !--पण कपाटाआड एकांत होता, कुणी बघायचं भय नव्हतं. गळ्यांत नसलेलं मंगळसूत्र कुणी चांचपेल ही धास्ती नव्हती...

तिला एकदम साऱ्या चोरटेपणाची शिसारी आली. आज दोन महिने हें चाललं होतं. चोरून रडणं, चोरून औषधं खाणं, चोरून...पण आतां संपणार होतं सारं ! अखेरचं अग्निदिव्य उरकलं कीं सुटका होणार होती. केव्हां एकदां सारं संपतंय् असं तिला झालं. आतुरतेनें ती आजूबाजूला पाहूं लागली.

तेवढ्यांत डॉक्टरच तिच्या पुढ्यांत आल्या. त्या हंसून म्हणाल्या,

" आलांत कां ?– सकाळीं आलां असतात तर बरं झालं असतं—"

तिचं हृदय वावटळींत सांपडलं. कशीबशी ती म्हणाली,

" आतां नाहीं का—"

" हरकत नाहीं. ती मागली खोली रिकामी करत्यें तुमच्यासाठीं—"

डॉक्टर गेल्यावर तिला सुटल्यासारखें झालें. पण मग वाटलें, डॉक्टरांच्या मागें धांवत जावें नि लवकर सुटका करून घ्यावी. एकटेपणाची तिला फार भीति वाटूं लागली. ती परकी जागा, तो वाढत जाणारा अंधार, अन् चोहोंकडे दिसणारे ते आईवडिलांचे चेहरे...ती आवेगानें उठली... पण तिला डॉक्टरांच्या हातांचं, सुईणींच्या हंसण्याचं, आजूबाजूच्या अर्भकांच्या रडण्याचं भय वाटलं. काय धिंडवडे होणार कोण जाणे !–

कपाटावर विषाची बाटली रिकामी होती, नाहींतर उचलावीशी वाटली असती तिला !

नाहीं तरी जगण्यांत काय अर्थ उरला होता ? प्रियकराबरोबर पळून जायचें, लग्न करून संसार थाटायचे, एकूणएक यत्न फोल ठरले होते. त्याचें दारिद्र्य, बेकारी, हलकी जात !–अन् आपल्या घराण्याची प्रतिष्ठा, संपत्ति !

अखेर कुणाशीं लग्न करून मढ्यासारखं, कुलटेसारखं जगणंच नाशिबीं येणार होतं...

तिचे डोळे डबडबले. मागल्या जन्मीं काय पाप केलं होतं म्हणून हें भोग वांट्याला आले होते ? वास्तविक किती मानानें, हक्कानें या ठिकाणीं यायचं? ...पण आज मातृत्वाचा हक्क हिरावून घेतला जात होता. प्रेम पूर्णत्वास न्यायची चोरी झाली होती.

विलक्षण विषादानें तिचं अंतःकरण भरून गेलं. पण तिने आपले डोळे कोरडे केले, पदर नीट केला. असं रडून चालणार नव्हतं. सर्व सोसायची तयारी करायला हवी होती.कधीं नाहीं तो धीर धरायला हवा होता. घरांतून तात्पुरती सुटका झाली होती; या संकटांतून कायमची सुटका होणार होती...

खंबीरपणें ती उभी होती. मग डॉक्टर आल्या तेव्हां त्यांना शांतपणें म्हणाली,

" झाली ना तयारी ?–उद्यां संध्याकाळपर्यंत परत..."

डॉक्टर हंसल्या व म्हणाल्या,

" माझ्यावर विश्वास ठेवा. माझा हातखंडा आहे. तुमच्यासारख्या अनेक मुली..."

ती स्वतःशींच म्हणाली, ' बोला, बोला...वाटेल ती विशेषणं वापरावींत असंच वर्तन घडलंय् माझ्या हातून...' पण तिचा निर्लज्जपणा तिलाच बोचला. स्वतःला सांवरीत, समजावीत, ती मुकाटपणीं डॉक्टरांच्या मागोमाग निघाली.

दिवाणखान्यात अनेक बाळंतिणी होत्या. तें पलंग, तीं पोरं, ते पाळणे पाहवेनात तिला ! साऱ्या सद्भाग्याच्या होत्या. पवित्र माता होत्या.फक्त ही... तिची दृष्टि खालीं गेली. चेहेरा काळवंडला. पाय लटपटूं लागले. कशीबशी ती मागल्या खोलींत पोंचली अन् दमून खुर्चीवर बसली.

खोलींतलं वातावरण नि वस्तू पाहून तर तिच्या पोटांत भीतीचा गोळा उठला.

—कशाला वेड्यासारखी त्याच्याकडें त्या दिवशीं गेलें ?– दोन वर्षं संमजसपणें,सीमेवरून वर्तन केलें, उच्च पातळीवरून वागलों. अन् अखेर पवित्र

प्रेम पायदळीं तुडवलं. साऱ्या कोमल भावनांची, आठवणींची राख केली. जें भाग्याचं, स्वर्गसौख्याचं ठरायचं तें पापी, पातकी ठरवलं...

" अर्रर्र-तुम्हांलाही चक्कर येते काय ?-नर्स, डोस दे यांना ! " डॉक्टर तिच्याजवळ येत म्हणाल्या. तिनें घाईनें स्वतःला सांवरलें. दुःखाचें दैन्याचे विचार दूर केले. उसन्या आवेशानें उभें राहून म्हटलें, " आटपा आतां... "

तेवढ्यांत गेलेली नर्स घाबऱ्या घाबऱ्या परतली. " डॉक्टर, पॉयझनची बाटली रिकामी पडली आहे कपाटावर..,मघाशीं मीच नीट पुसून कपाटांत ठेवली होती. बूच काढलंय् नि बाटली मोकळी—"

नर्सेस् नि डॉक्टर कावकाव करीत बाहेर गेल्या. ती पलंगाशीं शून्यपणें उभी राहिली.

...कितीतरी वेळ लोटला. जणूं तिचे दिवस पुरे भरले नि ती प्रसूत झाली. किती बाळसेदार मूल होतं तिचं ! थेट त्याच्यासारखं दिसत होतं. त्या दोघांच्या प्रेमाला साजेसंच नाजूक नि गोंडस !...छे छे, तिचे आई-बाप तिला कोंडून ठेवीत होते, तिचें पोटदुखण थांबत नव्हतं, तिचा छळ संपत नव्हता...

डॉक्टर धांपा टाकीत आल्या व तिच्या कानाशीं लागून किंचाळल्या, " तुमचे मिस्टर मघाशीं आले होते, तेच पॉयझन पिऊन गेले. मी चौकशीला माणूस धाडला होता. ते आपल्या खोलीवर जाऊन पडले आहेत... "

तिला क्षणमात्र अर्थबोध झाला नाहीं. मग ती विलक्षण नजरेनें पाहूं लागली. त्यानें विष खाल्लें ? जीव दिला ? तिचे डोळे मिटले गेले, अन् ती बेशुद्ध-होत धरणीवर कोसळली.

डॉक्टर, सुईणी, मोलकरणी बराच वेळ अवस्थपणें उपचार करूं लागल्या. तिला कसं व काय समजवावं, कुणालाच कळेना !—

—त्याने जीव दिला. किती करुण अन किती भीषण ! त्याचा चेहरा, त्यांचीं असंख्य रूपं, तिच्या मिटल्या नेत्रांपुढें ओवाळून गेलीं. किती प्रेमळ, किती उमदा ! आयुष्यभर परिस्थितीशीं झुंजणारा, पराकोटीचं प्रेम करणारा...

तिला हळूंहळूं जाग आली.अन् तरीही ती भानावर येईना;सारखा त्याचाच ध्यास तिला लागला. ह्या संकटानें पोळलेला, व्याकुळ झालेला त्याचा चेहरा तिला दिसूं लागला...प्रेयसीला फसवलें, बेजबाबदार, नादान ठरलों हेंच वेड त्याला व्याकुळ करीत होतें. कितीही सांगितलं तरी समजूत पडत नव्हती त्याची. हें अपयश असह्य झालं त्याला. केवढं अपूर्व अलौकिक प्रेम! त्या अलौकिक प्रेमामुळंच त्यानं जीवनयात्रा संपवली...

डॉक्टर तिला हलवीत होत्या, अन् मुईणींना म्हणत होत्या,

"काय गोंधळ आहे नसता!–अगदींच लफंगा दिसतो आहे तो इसम."

हळुंहळूं आजूबाजूचं जग तिल जाणवूं लागलं. बाजूच्या दिवाणखान्यांत बाळंतिणी वाटणीला आलेल्या नवऱ्याचा वंश पोशीत होत्या. किती ठिकाणीं संपूर्ण मीलन होतं? कितीजणींनीं प्रेम पाहिलं होतं?–प्रेम पाहिलं होतं फक्त तिनेच! तिच्याच प्रियकराला तिच्या अब्रूची चाड होती. तो कसा लफंगा?...

"लफंगा कसचा–मूर्खच होता तो"–म्हातारी मुईण म्हणाली, "घाब-रला काय, घेरी काय आली. जसं कांहीं तोच भोगत होता. कित्येक लोक थंडपणें सार करतात अन संसार थाटून सुखी होतात. पण ह्याचं प्रेम ना? कसलं मेलं हें प्रेम..."

हेंच प्रेम–! तिच्या तडफडत्या हृदयांत सूर उठले. म्हणूनच तो सहवेदनेनें व्याकुळ झाला. पापाच्या जाणिवेनें पोळून निघाला. प्रेममंदिर विटाळल्यावर बलिदान करायला सिद्ध झाला...त्याच्याबद्दल अभिमानानें तिचें हृदय भरून आलें...नव्या तेजानें फुललेले तिचे डोळे म्हणूं लागले, केवढा दिव्य पुरुष! आपला प्रियकर...आपला पति... हो पतिच!

ती जागी झालेली पहतांच घाईनें डॉक्टर म्हणाल्या,

"उठा, तुम्ही जा आतां, नाहींतर इथें किटाळ येईल काहींतरी. सर्व थंडावल्यावर मात्र या हं! तुम्हाला आतां तर मोकळं व्हायलाच हवं! कदा-चित् या धसक्यानेंच—"

ते ऐकतांच पुन्हां कोसळणारी काया तिनें विलक्षण निश्चयानें सांवरली. तो गतप्राण झाला हें तर खरंच; पण ती आतां बेशुद्धही पडणार नव्हती!

त्याला असेल तसा आंवरायला धांवणार होती. अवसान आणून ती उठली· त्याच्या मृत्यूच्या दुःखानें ती मूढ होत होती. त्याच्या दिव्य प्रेमाच्या साक्षात्कारानें तिला सुचेनासं झालं होतं. अन् तिचं स्वतःचं संकट ?—त्या संकटाच्या जाणीवेसरशीं तिच्या हृदयांत एकदम वेगळेच सूर फेर धरीत वेगानें वाढूं लागले. भव्य दिव्य प्रेमाचा अपूर्व प्रसाद तिच्या पोटांत होता. तो ती प्राणापलीकडे जपणार होती. संकटाशीं झगडून वाढवणार होती. ह्या गॉलिच्छ जागीं अशा कृत्यासाठीं आतां ती कदापिही येणार नव्हती. जें बेकायदेशीर, अनीतिमान ठरत होतें, तेंच ती आतां अभिमानानें, उजळ माथ्यानें मिरविणार होती...!

* * *

# बापू आणि बनू

सव्वीस नंबराची खोली. ' अंबिका आश्रम'मध्यें सगळ्या खोल्यांत तीच चांगली होती. माडीवर होती, कडेला होती व खोलीला खिडकी होती. भार्गवरामानें ' अंबिका आश्रम ' जेव्हां चालवायला घेतला तेव्हां प्रथम वरचा मजला बांधून काढला. तळमजल्यावर कचेरी, जेवणघर वगैरे व कुटुंबियाकरिता मोठ्या खोल्या आणि माडीवर सड्या मुशाफिरांसाठीं छोट्या खोल्या. त्यांतली शेवटची खोली सव्वीस नंबरची. खोलीवर आंकडा टाकतांच भार्गवरामांनीं आपला बाडबिस्तारा कचेरींतून हलवून त्या खोलींत टाकला. मालकासाठीं ती खाजगी जागा बनली आणि शेजारच्या खोल्यांतून प्रवाशांची भरतीओहोटी सुरू झाली. भार्गवरामाच्या धंदेवाईक हुषारीमुळें आणि गांवातल्या वाढत्या बाजारपेठेमुळें ' अंबिकाआश्रम ' लवकरच भरभराटींत चालूं लागला. सर्व तऱ्हेच्या उतारूंना परवडतील असे दर, आवडेल अशी व्यवस्था, अन् मुख्य म्हणजे रेल्वे स्टेशन केवळ शंभर कदमावर ! दिवसां नि रात्रीं आगगाड्या येत जात तेव्हां तऱ्हेतऱ्हेचे उतारू ' अंबिका आश्रमां'त मुक्कामाला येत. पुढें लवकरच गर्दी वाढूं लागली व वरच्या मजल्याची जागाहि अपुरी पडूं लागली. एक दिवस तर एक श्रीमान व्यापारी दुप्पट पैसे देऊन एका दिवसासाठीं एक खोली मागूं लागला. कुठेंच जागा नव्हती, म्हणून भार्गवरामांनीं स्वतःची सव्वीस नंबरची खोली तात्पुरती खाली करून दिली. व्यापारी जातो न जातो, तोंच एक नवविवाहित जोडपें येऊन थडकलें व तीच हवेशीर खोली मागूं लागले. खास खाजगी खोलीचें अस्तित्व तेव्हांच खलास झालें. तें जोडपें आठवडाभर ढंग करून गेलें. ब्रम्हचारी भार्गवरामाला तेथें परत मुक्काम ठेवणें जड वाटलें. मग माडीवरच्या इतर पंचवीस खोल्यासारखी ती एक भाडोत्री खोली बनली. एक पोलीस-इन्स्पेक्टर त्यांत बरेच दिवस राहिला. मग कुणी एजंट, वकील, व्यापारी, प्रवासी—गेल्या दोन तीन वर्षांत 'सव्वीस'मध्यें कोण कोण राहून गेले तें नोंदबुकांत धुंडाळणेंहि जिकीरीचें काम होऊन बसलें. खानावळींतल्या ताटवाटीसारखं

अगर आगगाडींतल्या बांकडयासारखं स्वरूप ठरलं त्या खोलीचं. विकत घेऊन वापरायची, उष्टावायची, काम सरलं कीं सोडायची ! प्रहर दोन प्रहरहि कुणी त्यांत वस्ती करत. कधींमधीं कुलुपांत रिकामीहि राही ...

( सव्वीस नंबराचें कुलुप नोकराने घाईनें उघडलें, खिडकी खोलली व रिकाम्या पलंगावर, टेबलखुर्चीवर फडकें मारलें. काल दुपारपासून सव्वीस नंबर मोकळी राहिली ती आज सकाळपर्यंत.आणि आतां सकाळची मेलगाडी आल्यावर पहिलाच उतारु ' अंबिका आश्रम ' कडे चालत आला होता. नोकरानें जमिनीवर पडलेलें सिगरेटचें मोकळें पाकीट उचलले, कालची राहिलेली कपबशी उचलली व तो नव्या उतारूला आंत घेऊं लागला. )

बापू मोंडकर ती खिडकी असलेली खोली पाहून खूष झाला. हातांतली कातडी पिशवी त्यानें टेबलावर टाकली व दारात थडकलेल्या हमालाला आंत बोलावलें. वाकलेला, थबकलेला म्हातारा हमाल ट्रंकवळकटी उतरवूं लागला. पलंगाखालीं ट्रंक सारून व पलंगावर बिछाना पसरुन त्यानें बापूला सलाम केला. बापूनें दिलेले पैसे पहातांच त्यानें पुन्हां एकदां लवून सलाम केला. हमला गेल्यावर, गडी गेल्यावर, बापूनें खोलीबाहेर खिडकीबाहेर पाहिलें. मग एकदम ट्रंक ओढून आंत ठेवलेला फोटो बाहेर काढला. तशीच उघडी ट्रंक ठेवून व ओणवं उभं राहून तो फोटोंतील छबी न्याहाळूं लागला. गाल, जिव्हणी, डोळे, केस ! अधाशासारखा, आसुसल्यासारखा तो केवढा वेळचा तसाच राहिला होता.

दाराशीं कुणी उभें असल्याचें उमगतांच बापू भानावर आला.चपापून पाहूं लागला. मॅनेजर भार्गवराम उभा होता. त्याला पाहतांच भार्गवराम हसला. व आंत आला. " तुम्ही होय?–म्हटलं कोण पॅसेंजर आलंय्. आणि जवळ जवळ दोन वर्षांनीं येतां आहांत. मला वाटतं दीड दोन वर्षांपूर्वी आला होतात. एकवीस नंबरांत उतरला होतात ना !–लग्न झालं होतं नुकतंच; नि नोकरी सोडायचं म्हणत होतात तेव्हां !..."

बापू कांहींच बोलला नाहीं. भार्गवरामाच्या हातून नोंदबुक घेऊन त्यांत नाव लिहूं लागला. निफाडहून आज आलों, नाशिकला उद्यां जाणार. धंदा औषध कंपनीचा फिरता विक्रेता. बापूचें तोंड कडू झालें. लग्न झालें तेव्हां-

पासून ही फिरतीची नोकरी सोडायचें त्यानें ठरवलें होतें. पण अजून तो अडकून पडला होता. आज ह्या गांवीं, उद्यां दुसऱ्या–सारा महाराष्ट्र महिना-भर पालथा घालायचा व मग जेमतेम आठवडाभर घरीं राहायचें, संसार करायचा ! बापूनें उसासा सोडला व तो कोट काढूं लागला.

भार्गवराम उठला. खिडकींतून थुंकत म्हणाला, " कशी हवेशीर आहे ही. सव्वीस नंबर म्हणजे स्वर्ग आहे अंबिका आश्रमांतला. तुम्ही कधीं इथें उतरलां नव्हतांत ना ? "

" नाहीं. गेलं वर्ष मी कर्नाटक विभागांत बदलून गेलों होतों. आतां पुन्हां पहिला विभाग मिळाला आहे. दर दोनतीन महिन्यांनीं एकदां तरी ह्या गांवांत चक्कर होईल—"

" गुड् ! " भार्गवराम बोलला व खोलीबाहेर पडला.

तो गेल्यावर बापूनें परत फोटो बाहेर काढला व टेबलावर ठेवला.मग त्याला काय वाटलें कोण जाणे, एकदम त्यानें बाहेर जाऊन भार्गवरामाला बोलावून घेतलें. टेबलावरच्या फोटोकडे त्याला नेत म्हटलें, " मालक, ही पाहा माझी मुलगी उद्या वर्षाची होईल. माझी मुलगी--बनू. "

" गुड् ! " भार्गवराम टेबलावरच्या फ्रेममधील त्या सांवळ्या मुलीच्या आकृतीकडे जेमतेम पहात म्हणाला.

" खूप हुषार आहे ती भार्गवराम. इतकी लहान आहे, पण सगळं समजतं तिला. मला 'बा'–म्हणून हांका मारते. अन मी प्रवासाला निघालों कीं 'टा–टा' करते. घरांत नुसता–"

भार्गवराम मध्येंच म्हणाला, " अहो, पण तुमच्या पत्नीचा फोटो तुम्ही दाखविला नाहींत. मागें लग्न होऊन आलांत तेव्हां फोटोहि आणला नाहींत नि लाडूहि आणले नाहींत. बघूं त्यांचा फोटो. "

बापू चरकला. बायकोचा फोटो त्याच्याजवळ नव्हता. कधीं काढलाच नव्हता. त्याला काय बोलावं तें समजेना. मग एकदम हंसून तो म्हणाला, " अहो, बायकोचा फोटो सारा वेळ छातीशीं बाळगणारा मी बाईलवेडा आहें थोडाच ! पोरीची गोष्ट वेगळी. " भार्गवरामची समजूत पटायच्या

आधीं त्याची स्वतःची समजूत पटली. भार्गवराम गेला तरी तो बनूच्या फोटोकडे टक लावून पहात राहिला.

–पोरटी काय गोड आहे ! भलतीच हुषार नि सुंदर.केवढे मोठाले डोळे नि भुरभुरते केस. महिन्यानें घरीं गेलों तरी ओळखते नि झेप घेते. आत्तां ती आईच्या मांडीवर पडून दुधाची बाटली चोखत असेल. मी मुंबईहून आणलेली बाटली आणि पुण्याहून आणलेल्या, खुंटीला टांगलेल्या चिमण्याकडे पहात असेल. दूध पिऊन झालं कीं, रांगत हिंडेल, उठायचा यत्न करील. आंघोळीसाठीं ओरडा करील. न्हाणं झाल्यावर पाळण्यांत... पोरटीचा उद्या वाढदिवस. पहिला वाढदिवस ! अन् मी मात्र शंभर मैल दूर. तिचा बाप, तिचा लाडका बाप दूर हिंडत आहें. महिना महिना दूर राहात आहें...बापूचे डोळे भरून आले व तो टेबलापासून दूर झाला. त्यानें कपडे बदलले, खोलीबाहेर जाऊन तोंड धुतलें व नाष्टा करून तो कामावर निघाला. कातडी बॅगेंत औषधांचीं सारी सँपल्स्, कॅटलॉग्ज आहेत कीं नाहींत तें नीट पाहिलें. गांवांतल्या आठदहा डाक्टर्सना व तीन औषधाच्या दुकानदारांना भेटायचें होतें. नवे कॅटलॉग द्यायचे होते व मालाची ऑर्डर मिळवायची होती. आज सारें काम आटोपून उद्यां पुढच्या गांवाला जायचें होतें. दुपारचें जेवण एका ओळखीच्या व्यापाऱ्याकडे उरकायचें व व एकदमच संध्याकाळीं खोलीवर यायचें असें ठरवून बापू उठला. फोटोचा मुका घेऊन, खोली बंद करून तो बाहेर पडला.

संध्याकाळीं सात वाजतां बापू अंबिका आश्रमांत परतला. कॅटलॉग व सॅपल्स् त्यानें वांटून टाकलीं होतीं व येतांना खाऊचे पुडे व खेळांचे डबे आणले होते. खोलीचें कुलूप उघडून त्यानें फोटोकडे पाहिलें. बिचारी बनू दिवसभर कोंडून होती. पण तरीहि रडत नव्हती ! बापूनें तिच्या पुढ्यांत खेळ व खाऊ ठेवला.मग बॅग उघडली व आणखी खाऊ नि खेळ बाहेर काढला. विजापूरला, होटगीला, सोलापूरला, कुर्डुवाडीला, मोहोळला प्रत्येक मुक्कामांत घेतलेले जिन्नस ! त्या ढिगांत तो फोटो बुडून गेला. बापूनें त्यांतून तो फोटो उचलला व त्याचीं चुंबनें घेत तो भरल्या आवाजांत पुटपुटला,

" तुझ्यासाठीं, बनू, तुझ्यासाठीं गांवोगांवची प्रत्येक पेठ मी लुटून आणली आहे. तुझ्या बापानें तूं हंसावीस, खेळावीस म्हणून हें आणलें आहे..."

...बनूनें झेंप घेऊन खुळखुळा उचलला, वाजवला. मग फुगा फुगवला, रबराची चिमणी भिरकावली,बापूला किल्लीची मोटार फिरवायला सांगितलें. बापू खोलीत मोटर हिंडवत होता व बनूला खांद्यावर घेत होता. बनूनें खाऊचे बकाणे भरले नि बापूचा सदरा खराब केला. मग पुन्हां ती शांत बसली. पाळण्यांत...फोटोंत. बापूनें सावकाशीनें सारा खेळ आंवरला. ट्रंकेत टाकला. हलकेच तो खोलीच्या दारांत येऊन उभा राहिला.

' अंबिका आश्रमांत ' रात्रीच्या जेवणाची गडबड सुरू झाली होती. ताट वाट्यांचे आवाज ऐकूं येत होते. चपात्या वाढण्याचे हुकूम सुटत होते. खोल्या बंद करून मेंबरलोक जेवणघराकडे जात होते. बापूच्या शेजारच्या खोलींतला गुजराथी व्यापारी कधींच जेवायला धांवला होता. बापूच्याच गाडीनें तो आज आला होता. त्या पलीकडच्या खोलींत कुणी पोलिस अधिकारी उतरलेला होता. ती खोली मात्र आंतून बंद होती. त्यानंतरच्या तेवीस नंबरात एक नाटकांतला इसम रहात होता. त्याच्या गाण्याचे आवाज आश्रमभर घुमत होते. पलीकडच्या खोल्या रिकाम्या होत्या, भरलेल्या होत्या. बापू सारी वर्दळ पहात सुन्नपणें उभा होता. मग नकळत तोहि खोलीला कुलूप लावून जेवायला गेला.

बापू जेवण आटोपून खोलींत परतला तो शेजारच्या गुजराथी व्यापाऱ्याला घेऊनच. जेवतांना त्याची व रमणभाईची ओळख झाली. बापू औषधांचा एजंट व रमणशेठ तेलाचा व्यापारी. पण दोघांच्या धंद्यांतल्या अडचणी व दुःख एकाच प्रकारचीं. गप्पा मारतां मारतां रमणशेठनें स्वतःच्या पेढीची माहिती सांगितली. काठेवाडांतून एका लोट्यानिशी दक्षिणेत कसें आलों, आणि आज सहा घाणे व एकोणीस डेपो कसे काढले तें सांगितलें. बापूलाच उलट औषधाच्या धंद्यांतल्या गमती सांगितल्या आणि बापू आपल्या हुषारीमुळें धंद्यांत खूप कमाई करणार असें भविष्यकथन केलें. रमणभाईचा तो मनमोकळेपणा पाहून बापू भारून गेला. त्याला आपल्या खोलींत बळेंच

घेऊन गेला. पोटदुखीच्या औषधाचें सँपल बहाल केलें आणि हलकेच मनांतली गोष्ट सांगितली,

" शेटजी, आपण औषधाचा धंदा चांगला म्हणतां खरा; पण मी तर विटलो बुवा ह्या फिरतीला ! "

शेटजीनें कानकोरणें वापरीत म्हटलें, " कां हो ?–अहो, चागला पैका मिळवतां येतो. सूटबूट घालून डॉक्टरशीं बात करता येते ! "

" खरं ! पण तिन्ही त्रिकाळ गावोगांव हिंडत रहायचं. संसाराचं सुख नाहीं. आपलीं पोरंबाळं आपल्याला परकीं—"

" अरे, रडलीं पोरंबाळं. आम्हीं नाहीं बायडीला मुलखावर सोडून इकडे वर्ष वर्ष भटकत ! पोरांचा तर विचारच करीत नाहीं ! "

शेटजींचे शब्द बापूचें हृदय चिरून गेले. त्यानें चावरून बनूच्या फोटोकडे पाहिलें. छे ! बायको जाऊं दे, पण बनूला एकटें टाकून दूर राहणें आतां अगदीं अशक्य होतें ! तिचें कौतुक कोण करणार ? तिला वळण कोण लावणार ? तो कळवळून म्हणाला,

" पहा शेटजी, मी कामसू आहें, हुषार आहें, असं तुम्हीच म्हणालांत. बघा, तुमच्या डेपोवर नौकरी देत असलांत तर. "

" आम्ही जेमतेम पन्नास रुपये देतो. तुम्हाला काय परवडणार—"

–बापूचा चेहेरा पडला. वडिलांनीं कर्ज करून ठेवलें होतें त्याचा हप्ताच पन्नास रुपयाचा होता. अन पन्नासांत काय भागणार ? मग काय हीच नौकरी करीत, बनूपासून दूर राहात जगायचें ?–त्याचा चेहरा काळवंडला. शेटजीचें कान कोरणें चालूच होतें. अंमळशाने पलीकडे उतरलेला कुणी नाटकी इसम शेटजींना हांका मारीत आला तसे शेटजी उठले व गेले. व्हरांड्यांत दोघांची कुजबूज सुरू झाली. अत्तराचा फाया, टांग्याचें भाडे, आवडाबाईचें गाणे, रात्रभर चैन...

हळुहळूं ' अंबिका आश्रमांत ' शांतता पसरली. जेवणघर बंद झालें. नळावरचे आवाज थांबले. दमलेले उतारू आपापल्या खोल्यांत निजले व रंगलेले मुसाफीर बाजारांतल्या माडयांत जागत राहिले. शेजारचे शेटजी व नट निघून गेले होते व पोलिस अंमलदार दार लावून दारू पीत होता. बापू

खिन्नपणें बनूच्या अंधुक छबीकडे पहात होता. त्याच्या डोक्यांत अंगाई गीत घुमत होते. तेंहि हळुहळू विरलें...बनू निजली...मग बापू उठला व खिडकीशीं उभा राहिला. अनेक कोसांवर असलेली आपली पोर पहायचा तो खिडकींतल्या आकाशांतून, आकाशगंगेंतून यत्न करीत होता. तसें पाहायचा, स्वप्नें रंगवायचा नि कल्पना करायचा खरे म्हणजे त्याला कंटाळा आला होता. पण त्याचा नाइलाज होत होता. खिडकीच्या गजाआड, हॉटेलच्या खोल्यांतून, आगगाड्यांच्या मार्गांमध्यें, तो अडकला गेला होता. स्वतःसाठी नाहीं, स्त्रीसुखासाठीं नाहीं, संसारासाठी नाहीं, पण त्या अत्यंत लाघवी, लबाड पोरीसाठीं तळमळत, तडफडत, तमाच जागत राहिला होता!

मध्यरात्रीं शेटजी परतल्याचा आवाज आला. खिडकी लावून त्यानें टेबलावरचा फोटो उचलला व तो पलंगावर पडला. पलीकडच्या खोलींत शेटजी आवडाबाईनें गायलेली लावणी गुणगुणत होते आणि इकडे बापू बनूच्या फोटोला पोटाशीं धरून पहुडला होता. डोळे लाल झाले होते, ओले झाले होते. थोडी गुंगी लागते न लागते तोंच पहांट झाली. गडी उठवायला आला. जराशानें भार्गवरामहि बिल घेऊन आला. "काय मोंडकरसाहेब, जागरण झालेलं दिसतंय? रात्रीं कुठें गेलां होतांत होय?" भार्गवराम बिलाचे पैसे मोजीत म्हणाला.

बापूनें निमूटपणें सामान आवरलें, तोंड धुतले, चहा घेतला. भार्गवरामाला बेट्याला काय कल्पना होती त्याच्या व्यथेची? त्याला कुठ मुलगी होती? नि त्यानें कुठें बनू पाहिली होती? त्याला वाटतें, सारेच प्रवासी चंगीभंगी! दारांत हमाल आला होता, त्याला बापू म्हणाला, "उचल. नाशकाच्या गाडीला न्यायचं."

नाशिकच्या गाडीला पंधरा मिनिटें होतीं. दोन तासांनी नाशिक; तेथें दोन दिवस मुक्काम; मग पुढें...बापूला पुढचें कांहींच आठवेना. बरोबर ह्या घटकेला बनूला जन्मून वर्ष होत होतें. आज तिचा वाढदिवस! बापूनें पाठवलेलें कपड्यांचें पार्सल आज पोचेल. पेढे वांटले जातील व बनूला फुलांचा पोशाख घातला जाईल....वाढदिवसाची वाजंत्री ऐकत बापू बाहेर पडला...

( तो गेल्यावर गड्याने रिकाम्या टेबलावर, पलंगावर फडकें मारलें. टेबलावर पुडींतलें लिमलेट पडलें होतें व त्याभोंवती मुंग्या जमल्या होत्या. गड्यानें मुंग्या झटकल्या व कपबशी उचलली. मग शेजारच्या रमणशेठचें सामान पंचवीस नंबरांतून उचलून ह्या खोलींत आणून टाकलें. रमणशेठला ही हवेशीर खोली हवी होती. तो दोन दिवस राहिला. नतर कुणी सरकारी अंमलदार त्या खोलींत आठवडाभर तळ देऊन होता. मग आला...अनेक प्रकारचे प्रवासी इतर खोल्यांप्रमाणें सव्वीस नंबरामध्यें राहून जाऊं लागले.बापू मोंडकरची चक्कर त्या गांवी होई; पण ती खोली कांहीं त्याच्या वाट्याला येईना. दुसरीकडे तो उतरे व निघून जाई. महिने गेले, वर्षे गेलीं,पण सव्वीसमध्यें बापू उतरण्याची संधि आली नाहीं......)

आणि एक दिवस सव्वीस नंबर रिकामा व्हायला व बापू मोंडकर 'अंबिका आश्रमां'त यायला एकच गांठ पडली. जवळजवळ सात–आठ वर्षांनी हा योग आला. ती कडेची, खिडकी असलेली खोली पाहून तो खुलला. त्याच्या एकदम ध्यानांत आले कीं बनूचा पहिला वाढदिवस होता, त्या दिवशीं आपण ह्याच खोलींत उतरलो होतो. हेच ते टेबल, अन हीच ती खिडकी. स्टेशनवर मिळालेला जवान हेलकरी झपझप चालत आला म्हणून ही खोली मिळाली. त्याने खूष होऊन सामान रचणाऱ्या हेलकऱ्याला बक्षिसी दिली.

हेलकऱ्याच्या मागें, उंबरठ्यावर बनू उभी होती ! परकर--पोलका घातलेली, दोन वेण्या घातलेली. गळ्याला मफलर व खांद्यावर पाण्याची पिशवी ! प्रवास करून शिणलेली तिची अष्टवर्षीय आकृती आकर्षक वाटत होती.

बनू आंत आली व पलंगावर बसत म्हणाली, "अय्या ! किती छान खोली आहे, नाहीं बापू ? आपण इथे इतके वेळां आलों, पण भार्गवरामांनीं एकदांहि दिली नाहीं ही आपल्याला. अन् भुसावळच्या, चाळीसगांवच्या, धुळ्याच्या हॉटेलमधल्या खोल्यांपेक्षां ही खोली खूपच छान आहे..."

बापू तिचा उल्हास पाहून आनंदला. बनूला . ती जागा आवडली ह्याचा

त्याला आनंद झाला. त्यानें वळकटी उलगडली व बनूचा नवा परकर-पोलका काढला. ट्रंकेंतून आरसाफणीचं काढलं. मग तो म्हणाला, " आटप आता ! वेणी घालं ना तुझी ? मग मला जायचंय् ग राऊंडवर. काम आटोपून उद्यां पहांटे पुढच्या मुक्कामावर जायचंय् ना आपल्याला—"

तेवढ्यांत भार्गवराम नोंदबुक घेऊन आला, " गुडनेस् ! म्हटलं, लेक बरोबर आहे कीं नाहीं ? का एकटेच आलांत ? काय, ओळख आहे का बनुताई ? "

" वा, भार्गवराममामा, ओळख विसरायची नाहीं मी तुमच्या इथल्या इडलीसांबाराची. इथली इडली, नाशकाचा चिवडा, मनमाडचें घावन-- बापू, मी खाऊं इडली आत्तां ? "

बनूनें सकाळींच खात बसावें हें बापूला बरें वाटेना. रात्रीं गाडींत तिने हट्टानें पुरी-भाजी घेतली होती. वेड्यासारखे वागते, खाते, नि मग बापूच्या जिवाला घोर लागतो ! पण तिचें रडवें तोंड पहातांच तो विरघळला. म्हणाला, " जा--खा ! "

बनू उड्या मारीत गेल्यावर भार्गवरामानें नेहमींसारखे नोंदबुक भरलें. बापूचे नांव लिहितांना तो म्हणाला, " मोंडकरसाहेब, पोरीला कुठवर हिंडवत राहणार असं तुमच्याबरोबर ? "

" काय करावें मालक ! आईविना पोरगी. कुठें ठेवायची तिला ? माझं कोणी नात्याचं नाहीं. तिची एक मावसमावशी आहे; पण ती कशाला सांभाळेल हिला ? अन मी तरी कशी ठेवीन परक्याकडे ? "

" गुडनेस् ! पण तुम्हांला त्रास—"

" छे छे, मालक. मला त्रास होत नाहीं. अगदीं गरीब नि हुषार पोर आहे. मी कामावर गेलों कीं एकटी खेळते. गाडींत रडत नाहीं. हॉटेलांत असेल तें अन्न खाते—" बोलतां बोलतां बापूचा ऊर वात्सल्यानें भरून आला. इडली खाऊन परतलेल्या बनूला त्यानें मांडीवर घेतलें व कुरवाळलें.

मग भार्गवराम गेल्यावर बापूनें बनूची वेणी घातली. तिला आंघोळ घालून पावडर लावली. तिचा पापा घेऊन तो कामावर निघाला. एक

वाजेपर्यंत परत यायचें व येतांना खाऊ आणायचें कबूल करून तो गेला.

बापू गेल्यावर बनू बाहेर आली. शेजारच्या खोल्यांतून कोण राहतें तें पहायचा तिनें प्रयत्न केला. 'पंचवीस'मध्यें उतरलेला पंजाबी व्यापारी खोली बंद करून जात होता. त्याचे जरतारी चढाव तिला आवडले. पुढल्या खोल्यांतून कुणी फौजदार नि विद्यार्थी राहात होते. बनू परत उंबरठ्यावर आली व समोरून जाणाऱ्या गड्याला डोशा आणायला सांगूं लागली. दारांत बसूनच तिनें डोशा खाल्ला. मग खिडकींत उभें राहून ती रस्त्यावरची गंमत पाहूं लागली. रस्त्यावर मुलें पाटी-दप्तर घेऊन शाळेला जात होतीं. समोरच्या बंगल्याच्या दारात एका लहान मुलाला आई मारीत होती. सिनेमाच्या जाहिरातीची ढकलगाडी वाजत गाजत जात होती. जरा वेळ तसें उभें राहून बनू कंटाळली व आंत पळाली. ट्रंकेंतून तिनें खेळ काढला व जमिनीवर बसून ती खेळूं लागली. टेबलाचे, खुर्चीचे, पलंगाचे ग्वूर म्हणजे एकएक स्टेशन. हातांतली लांकडाची आगगाडी स्टेशनें घेऊं लागली. मुंबई, कल्याण, कर्जत, खंडाळा, लोणावळा, पुणें, दौंड...प्रत्येक स्टेशनवर मोंडकर उतरत. औषधांचीं व खाऊंचीं दुकानें तपासत. मध्येंच बनूनें खिशांत जमवलेली आगगाडीचीं तिकिटें काढलीं. ती चेकर बनली, गार्ड बनली, वेटर बनली. अखेर बापूचें रेल्वेच्या टाइम टेबलाचें पुस्तक पहात बसून राहिली.

बापू आला तेव्हां ती पेंगुळली होती. गांवोगांवीं जमवलेल्या आगगाडीच्या तिकिटांचा सडा खोलीभर पडला होता व रेल्वेच्या वेळापत्रकांवर डोकें टेकून ती पडली होती. बापूनें तिला हलकेंच जागे केलें. जेवायला नेलें. जेवण झाल्यावर मात्र ती झोपेना. दमलेल्या बापूला सतावूं लागली. खाऊं कां नाहीं आणला, संध्याकाळीं सिनेमाला जायचें ना, आज गाडी लेट कां झाली, तूं आगगाडींतच औषधें कां नाहीं विकत ? मुली हॉटेल चालवतील का...एक ना दोन ! बापू मध्येंच त्रासून जाई व तिला दटावी. पण मग लगेच तिला पोटाशीं धरून तिचें कौतुक करी.

—खरेंच, किती वेड लावणारी पोर होती ती ! बापूचें सर्वस्व, आयुष्यांतली सारी आशा, सारा आनंद म्हणजे बनू ! जगावेगळी नि आई

वेगळी. आई जाऊन दोन वर्षें झालीं, पण दोघांनीं दुःख गिळलें व एक-मेकाला कवटाळलें. बापूच तिची आई बनला. बनू आतां अहोरात्र त्याच्याजवळ राहूं लागली, त्याच्याबरोबर फिरूं लागली. दीड महिना फिरती व दोन आठवडे घरीं. बेटी कशी ऐटींत गाडींत चढते. खिडकीशीं बसते व कुठलेंहि स्टेशन ओळखते. हमालांची, हॉटेलवाल्यांची नक्कल बेमालूम करते. अन् प्रत्येक हॉटेलींत सर्वांशीं दोस्ती करते. आहेच ती मोठी गोड-वेड लावणारी...बापू तिला थोपटत झोपवायचा यत्न करूं लागला, पण ती उसळून म्हणाली,

"अं ! मी नाहीं झोपणार जा. मला झोपवून तूं जातोस. मी नाहीं निजणार. मला आत्तां सिनेमा पहायचाय्– "

तिला झोपवून आपण जातों हा आरोप ऐकून बापू चरकला. पण मग चिडून तो म्हणाला, " अग, काल तूं बाहुल्यांचा खेळ पाहिलास ना ! रोज रोज काय...थांब तुला पाटी--पुस्तक आणून देतों. अभ्यास तर कांहींच माहीत नाहीं. इतर मुली बघ–"

त्यासरशी बनूनें भोकाड पसरलें. तिचें रडें अंबिका आश्रमभर पसरूं लागलें तेव्हां बापू बावरला. परक्या मुलखात आईविना एक पोर ओक्साबोक्शीं रडतें आहे हें त्याला हृदयद्रावक वाटलें. त्याचे आंतडे तिच्या अश्रूंसरशीं तुटूं लागले. तो उठला व तिला नवे कपडे चढवूं लागला. टांग्यात बसून सिनेमाला न्यायचे व तेथें लेमनची बाटली द्यायचें त्याने कबूल केलें व तिच्यासह तो बाहेर पडला.

रात्रीं बाप-लेक परतली तेव्हां बनू तृप्त झाली होती; व त्यामुळें बापूला समाधान वाटत होतें. टॉफीचा डबा मिरवत ती अंबिका आश्रमांत आली. भार्गवरामाला, नोकराला व अनोळखी मेंबरांना 'टा टा—' करीत खोली-वर आली. जरा वेळानें पलंगावर पडली व तत्काळ झोंपीं गेली. तिला थोपटत बापू बराच वेळ बसला होता. बनूबद्दलच्या उलटसुलट विचारांनीं त्याचें मन नेहमींसारखें व्यापत होतें. पोरीचा हट्टीपणा फारच वाढत चालला आहे. वाचणें–लिहिणें तर मुळींच नाहीं; पण घरचें, स्त्रीचें वळणहि लागत नाहीं. सारखें प्रवास करून , जागरणें करून, वेगवेगळ्या ठिकाणचें पाणी

पिऊन नि अर्धें कच्चें खाऊन अंग मात्र झडत चाललें आहे. काय करावें, काय करावें ?...

जेवण आटोपून बापू परतला तों शेजारच्या विद्यार्थी व पंजाबी प्रवाशांना बरोबर घेऊनच ! जेवतांना तिघांची ओळख झाली व मग भार्गवरामाच्या टेबलापाशीं बडिशेप चघळतांना गप्पा पण झडल्या. बापूला त्या दोघांनीं बनूबद्दल कुतूहलानें बरेंच विचारलें. बापूने बनूची स्तुति केली; स्वतःची व्यथा सांगितली. आणि मग दोघांना घेऊन तो आपल्या खोलीशीं आला. व्हरांडयांतूनच तो पलंगावर शांत निजलेल्या बनूला दाखवूं लागला. त्यांना ती आवडली, तिची अनुकंपा वाटली, हें पाहून त्याला बरें वाटलें. उंबर-ठ्यावर उभें राहूनच तो हलक्या आवाजांत सांगूं लागला,

" तुम्ही म्हणतां लालाजी, पण कशी सोडूं ह्या गोड पोरीला ? उभ्या जगांत आमचं नात्याचं, मायेचं बाईमाणूस कुणी नाहीं. बोर्डिंगांत ठेवायला माझं मन धजत नाहीं. इथं हॉटेलांतून जी परवड तीच बोर्डिंगांत. अन् तिला अशी दूर ठेवून मी कुठवर जगत राहूं ?"

तो विद्यार्थी मध्येंच म्हणाला, "तुम्ही लग्न कां नाहीं करीत दुसरं ?"

" दुसरं लग्न !" बापूचा चेहेरा भेसूर झाला. " म्हणजे सावत्र आईचा छळ. मी गांवोगांव हिंडणार नि माझ्या मुलीला माझी नवी बायको छळ-णार. हालहाल करून ठार मारणार !– मीहि कदाचित् बायकोच्या आहारीं जाऊन बनुपासून दुरावणार. छट्–दुसरं लग्न करायचा विचारसुद्धां भयंकर वाटतो–"

लालाजींनें सिगारेट पेटवली, बापूला दिली व म्हटलें, "मग तुम्ही आपलं तारुण्य असंच दवडणार ? अन् मुलीला मोठी होईपर्यंत अशी हिंडवणार ! "

बापूनें अस्वस्थपणें सिगरेटचे भराभर झुरके घेतले. हलकेंच तो म्हणाला, " स्त्री नाहीं म्हणून ही सिगारेट मीं जवळ केली आहे. गाण्यालाहि जातों कधीं कधीं. पण पोरीपुढें पत्नीची, स्त्रीची मला पर्वा नाहीं अन् आतां मी पैसाहि सांठवूं लागलों आहें. पुरेसे पैसे जमले कीं कुठेंतरी

औषधाचें दुकान काढून बसणार एका जागीं, एका गांवीं. मी नि माझी बनू. ती मग स्वैपाक करील, घरांत राहील–"

सिगरेटी संपवीत तिघेहिजण व्हरांड्यांत उभे होते. अंबिका आश्रमांतली गडबड झपाट्यानें आटोपत होती. स्वैंपाकघरांतला जाळ विझत होता व जेवणघरांतले दिवे बंद होत होते. रात्रीच्या गाडीने जाणारे उतारू बाहेर पडत होते. बाहेरची दिंडी लावली जात होती. सिगरेटी संपल्यावर तिघेहि आपल्या खोलींत परतले. बापू बनूजवळ आला. पलंगाखालीं कोसळलेला तिचा हात त्यानें नीट ठेवला व अंगावर शाल टाकली. मग तो अस्वस्थपणे फेऱ्या घालूं लागला. त्याच्या मनाची तळमळ वाढूं लागली. अखेर दिवा मालवून तो दारात आला. व्हरांड्यांत उभ्या असलेल्या पंजाबी पडोसीला म्हणाला, "लालाजी, रोशनच्या गाण्याला निघालात ना ? मी येतों."

बापू गेला व बनू निजून राहिली. एकटी, एकाकी. कच्च्या चपात्या पोटांत टोचत व अस्वस्थपणें ती कुशी बदले. मध्येच हंसून बडबडे..."बापू, कंटाळा आला घरीं राहायचा. पुन्हा प्रवासाला कधीं जायचं ?...नऊ नंबरच्या माणसानं मला चॉकलेट दिलं...अकरा तीसच्या गाडीनं मनमाडला जायचं ना ?...हें हॉटेल नको...एक मिसळ दे रे...तुम्ही मला आवडत नाहीं, बापू..."

बापू अपरात्रीं परत आला. बनूची शांत, निद्रित मूर्ति पाहून चरकला. आपल्या वर्तनाची त्याला विलक्षण शरम वाटली. रोशनकडे तो विशेष सुखावला नव्हता. तिनें पान दिलें तेव्हां बनूची आठवण होऊन तो बाजूला झाला होता. बनूला टाकून तो बायकांच्या मागें लागत होता ! बापूला अपराध्यासारखें झालें रोशनकडे त्यानें दहा रुपये उडवले होते. असें वागले तर औषधाचे दुकान थाटायला भांडवल कसें जमणार ? अन बनूची व आपली विटंबना कशी थांबणार ? तो पलंगावर बनूजवळ निजला व खिडकीतून काळोखी रात्र निरखीत पहांटेची वाट पाहूं लागला.

पहांटे तो उठला व तोंड धुवून बनूला जागें करूं लागला. झोपेने ग्रासलेली बनू रडूं लागली व रागानें तशीच फरशीवर आडवी झाली. बापूनें बिछाना गुंडाळला, सामान आवरलें व दारांत आलेल्या भार्गवरामाचे

पैसे चुकते केले. भार्गवराम म्हणाला, " बनूचे पैसे पुरे नाही घेणार मी' अहो, लहान पोर ती.—अन् रोशनकडे कसा रंग आला काल ? अहो' माझ्यासारखा ब्रम्हचारीहि भाळला आहे तिच्यावर-हाः हाः-" हंसतच भार्गवराम गेला व हमालाला हांक मारूं लागला.

हमालानें सारें सामान उचललें. चहा संपवून बापूनें कातडी पिशवी घेतली. खालीं पसरलेल्या बनूला अलगद उचलून खांद्यावर घेतलें. ती त्याच्या अंगावर तशीच पेंगून पडली. तिला सांवरीत तो हमालाला म्हणाला, " चल नाशकाच्या गाडीवर—" नाशकापर्यंतचा प्रवास, मग नाशिकला मुक्काम, नंतर पुढें...खांद्यावरच्या जीवाला सांभाळीत बापू पुढच्या प्रवासाला निघाला...

( बापू मोंडकर मुलीला घेऊन गेल्यावर गड्यानें झाडू आणला व सव्वीस नंबर साफ केली. पोरीनें आगगाडीच्या तिकिटांचा व डोशांच्या तुकड्यांचा कचरा खोलीभर केला होता. दोन तीन दिवस खोली रिकामीच राहिली. मग एका अपरात्री भर पावसात लग्न ठरवायला आलेला कुणी एक तरुण त्यांत येऊन राहिला व दोन दिवसांत लग्न ठरवून गेला. मग कोणी भुरटा मवाली तेथें तळ देऊन होता. खोली तऱ्हतऱ्हेच्या प्रवाशांना भरे, वापरली जाई. मोंडकरांना मात्र ती मिळूं शकली नाहीं. ते कधीं सहा नंबरांत तर कधीं एकवीस नंबरांत राहात. एकदां पंचवीसमध्येंहि उतरले. पण सव्वीस नंबरची खोली कित्येक महिने, कित्येक वर्षें वाट्याला आली नाहीं त्यांच्या... )

एक दिवस भार्गवराम घाईनें गड्याला म्हणाले, " अरे, सव्वीस नंबर खाली आहे ना ? उघड, उघड लवकर. मोंडकर आले आहेत. आटप. "

गड्यानें सव्वीस नंबरची खोली उघडली. स्टेशनवरच्या एका छोकऱ्यानें ट्रंक वळकटी डोक्यावरून आणली हाती ती आंत घेतली.एवढें जड सामान आणल्याबद्दल पाहुणे बाबा अगर बाई बक्षिस देतील म्हणून छोकरा वाट पहात राहिला व अखेर कंटाळून गेला.

बनूनें पर्स टेबलावर फेकली व रुमालानें वारा घेत ती खोलीभर हिंडली, आंत येणाऱ्या भार्गवरामांना ती म्हणाली, " भार्गव, आम्ही इतक्यांदा

तुमच्या अंबिका आश्रमांत येतों; पण ही खोली कधीं दिली नाहींत तुम्हीं. आज तीन चार वर्षं तरी ह्या खोलींत उतरलेलं मला आठवत नाहीं—" बोलतां बोलतां तिनें गिरकी घेतली व ढळलेला पदर पुढें घेत ती पलंगावर पसरली.

बनूच्या आगमनानें आनंदित झालेल्या भार्गवरामानें जीभ काढली, " ओ गॉडेस् ! " तो लाचारीनें म्हणाला, " आमच्या आश्रमात ही खोली म्हणजे स्वर्ग आहे. तुम्ही दर दोन तीन महिन्यानें एक दिवस येतां—तुमच्या-साठीं कायमची रिझर्वच करतों ही खोली—"

" छे छे ! मीं थट्टा केली ! एका गांवांत जसं मला राहायला आवडत नाहीं, तसं तीच तीच खोलीहि आवडायची नाहीं राहायला. नावीन्य हवं, भार्गव, नावीन्य. नावीन्य नि गति—" बोलणं थांबवून तिने आपले लांबसडक शेपटे कुरवाळले व लांबसडक पापण्यांतून खिडकीबाहेर नजर टाकली.

उंबरठ्यावर उतारवयाचे, अर्धांग लुळे झालेले बापू अवघडून उभे होते ! बनूने नोटबुकात नांव लिहिलें व भार्गवरामाला घालवले तेव्हां ते आंत आले. काठी टेकीत डावं अंग ओढीत खुर्चीवर टेकले. कुठे तरी बघणाऱ्या व कांहीं तरी गुणगुणणाऱ्या बनूकडे टक लावून पाहात राहिले.

बनू एकदम उठून बसली व लांब नखावरचा लाल रंग चाटीत म्हणाली, " बापू, इगतपुरी स्टेशनवर निहालचंद जॉर्जेटची जोडी घेऊन येईन म्हणाला होता, पण आला नाहीं. फसवलंन् मेल्यानं. मी पण त्याची अंगठी आणली आहे ती देणार नाहीं—"

बापूंचे खोल गेलेले डोळे थरथरले. खोल आवाजांत ते उद्गारले, " मी दमलों आहें, मला धांप लागली आहे. मला चहा हवाय्. अन् औषध—"

बनूने त्याच्याकडे त्रासिक मुद्रेनें पाहिलें. चहा मागवला व ट्रंकेंतून औषधाची बाटली काढीत म्हटलें, " तुम्हाला त्रास होतो, ही एकसारखी भ्रमंति सोसवत नाहीं. पण एका जागीं राहा म्हटलं तर ऐकत नाहीं. पुण्याला आपली खोली आहे, नाहीं तर पंढरपूर आहेच—"

बापू औषध पिऊन म्हणाले, " तेंच तर मी म्हणतों आहें, बाळ. पुण्याला खोलींत राहूं आपण दोघंजणं. "

" दोघंजणं ? " बनूनें कपाळाला आंठ्या घालून बाटलीचें बूच बंद केलें. " मी नाहीं राहायची एका जागीं. कुठल्याहि ठिकाणीं दोन दिवसावर राहिलं तर माझं डोकं दुखूं लागतं. आज एक तप मी हिंडतें आहे. तेंच मला आवडतं, मानवतं. रोज नवं आकाश, नवं गांव, नवीं माणसं ! मला तर आतां महाराष्ट्राबाहेर भटकायची लहर आली आहे. आज आग्रा, उद्यां दिल्ली, परवा पंजाब. . .

तें ऐकतांच बापूंचें अंग थरथरलें. कांपऱ्या स्वरांत ते म्हणाले, " बनू, तुझं लग्नच करायला हवं—"

बनू भडकली. रडव्या आवाजांत ओरडली, " बापू ! असलं कांहीं बोललांत तर बघा हं ! मी निघून जाईन कुठें तरी कायमची—"

बापू लगेच शांत झाले. व्याकुळ होऊन मुलीकडे पाहूं लागले. बनू आपल्यापासून दूर जाणार, दृष्टिआड जाणार, हा विचारच त्यांना सहन होईना. बनू कुठेंहि गेली तरी तिच्या मागोमाग लळतलोंबत जायची त्यांची तयारी होती. ती कुठेंहि गेली, तिनें कांहींहि केलें तरी चालेल, पण बापाला एकटें टाकून, दुःखाच्या खाईत ढकलून तिनें जाऊं नये एवढीच त्यांची एकमेव इच्छा उरली होती.

चहा-पाव आला व दोघांनीं मुकाट्यानें नाष्टा केला. मग बनू आरशासमोर बसली. किती तरी वेळ तिचें सौंदर्यप्रसाधन चालू होतें. खूप खपून वेण्या घातल्या. पुण्याला घेतलेली कुंकवाची बाटली, मुंबईहून आणवलेली स्नो पावडर, म्हैसूरची सिल्क साडी. . .'अंबिका आश्रमां'त अप्सराच अवतरली जणूं ! मग मध्येंच ती स्नानगृहांत जाऊन आली. भार्गवरामाशीं गप्पा मारून आली. परततांना बाजूच्या खोल्यामधून कोण कोण उतरलें आहे तें निरखलें. तेवीस नंबरांत कुणी फौजदार होता, त्याच्या अंगावरून ती मुरडत गेली. मग एक सिनेमानट व जवळच्या खोलींत कुणी बोहरी व्यापारी. डोळे मोडीत फिरवीत ती खोलींत आली. जरा वेळ बसली. पण तिला लगेच कोंडल्यागत झालें. इगतपुरीला एका ख्रिश्चन इंजिन ड्रायव्हरनें

दिलेल्या सॅंडल्स चढवीत तिनें पर्स उचलली. बापूंना म्हटलें, " मी जरा जाऊन येतें हं–" अन् अंगाला झोके देत ती अदृश्य झाली.

तिच्या पदराचें टोंक दिसेपर्यंत बापू तिच्याकडे पहात होते. मग तिचे दूर जाणारे सॅंडलसचे आवाज ते ऐकत राहिले. अखेर सारेच्च सरले. बनू गेली. तीन चार तास तरी येणार नाहीं, दिसणार नाहीं. कदाचित ती कधींहि येणार नाहीं. येणार नाहीं ? बापू ह्या कल्पनेनें कासावीस झाले. त्या छोट्याशा खोलींत त्यांना डाबल्यासारखे झालें; उठावेसें वाटलें, पण तेवढें धैर्य झाले नाहीं. मागोमाग गेलें तर बनू रागावेल म्हणून ते पडून राहिले स्वतःच्या दुर्दैवाचा विचार करीत ! काय विलक्षण, भयंकर आयुष्य त्यांच्या वाट्याला आलें होतें ! अतोनात कष्ट करून त्यांनीं आठ एक हजार रुपये शिल्लक टाकले. प्रवासाची दगदग झेपेनाशी झाली म्हणून कुठें एका जागीं राहून औषधाचें दुकान काढायचें ह्या कल्पनेनें ! वाढत्या वयाच्या बनूलाहि कांही तरी वळण लागलें असतें. आपले असे घर लाभलें असते. बिचारीचें सारें बालपण विनाकारण गांवोगांव हिंडण्यांत गेलें, सर्कशीचीं जनावरें हिंडवतात तसें. स्वैंपाक नाहीं, शिक्षण नाहीं, मैत्रिणी नाहींत, माया नाहीं...पण मग बनूनेंच दुकान थाटायचा विचार खोडून काढला. गांवोगांव हिंडायची तिला चटकच लागली अन् गांवोगांव उनाडायची ! तिच्या वागण्यानें बापूंचें मन फाटून गेलें. त्यांना तिच्यावर रागावताहि येईना नि डोक्यांत राख घालतांहि येईना. अन् अखेर अर्धांगवायूंत ते अडकले. स्वतःला जेमतेम सांवरीत ते भटकणाऱ्या बनूच्या मागून दीनवाणेपणानें फरपटूं लागले. केवढें क्रूर, अमानुष !

बारा वाजले तरी बनू आली नाहीं. बापू हवालदिल झाले. त्यांना भूक लागली होती. पण बनूच्या आधीं अन्न खाणें अप्रशस्त वाटलें. ती आपल्याला हिडीसफिडीस करते, पण आपण मात्र तिच्यासाठीं जीव टाकतों ह्याचा त्यांना राग आला. शिलकींतले पैसे संपले म्हणजे वठणीवर येईल असें वाटलें होतें; पण आतां कुणाकुणाकडून पैसे लाटून ती बॅंकबुक भरत आहे हें उमगून ते अधिकच भडकले. त्यांना वाटलें; हातांतल्या सोटयानें बनीला चांगली बडवून काढावी ! ह्या लुळ्या हातानें तिचा गळा...

तेवढ्यांत बनू आली. तिला पाहतांच बापूंचा सारा राग थिजला ! ती बरोबर दोन मित्र घेऊन आली होती तरी ते बोलले नाहींत. आंतल्या आंतच जळत राहिले. ह्या गोड पोरीवर, पोटच्या गोळ्यावर कसें रागवायचें ? ते वेड्यासारखे तिच्याकडे पाहात म्हणाले, "किती उशीर ? जेवायची वेळ--"

" मी जेवून आलें बाहेर ! हे दोस्त भेटले. हे इथलेच आहेत; अन् हे नागपूरचे. आपण अजून नागपूरला गेलो नाहीं बापू--"

बापू कसेबसे उठले व जेवणघराकडे जाऊं लागले. भुकेनें पोटात आग उठली होती. दुःखाने डोळे डबडबले होते. वात्सल्याने हृदयांत कालवा-कालव होत होती !

बापू गेल्यावर सव्वीस नंबरमध्यें हसण्याखिदळण्याला सुरवात झाली. जराशानें शेजारचा बोहरी डोकावून गेला व मग तोहि त्यांत सामील झाला. बनूच्या सौंदर्याचे वर्णन, तिच्यावरील प्रेमाचें प्रदर्शन. नागपुरी इसम नागपूरच्या संत्र्यांची व आदरातिथ्याची तारीफ करीत होता. बोहरी सिलोनला केलेल्या सफरीचें वर्णन सांगत होता. बनूला आपल्या सौंदर्याची स्तुति ऐकून अस्मान ठेंगणें होत होते, अन संत्र्यांचीं, समुद्राचीं व सिलोनचीं वर्णनें ऐकून जगभर हिंडल्याचा आनंद लाभत होता !

बापू जेवून खोलींत आले तेव्हां मात्र बनू उठली. तिला काय वाटलें, कोण जाणे ! तिनें आपल्या मित्रांना हुसकावून दिलें. बापूंना हाताला धरून पलंगावर बसवलें व म्हणाली, " जेवलांत बापू पोटभर ? काल गाडींत कांही खाल्लं नाहीत. पडा ना, पडा जरा स्वस्थपणे. "

तिची काळजीची नजर व आवाजांतला आपलेपणा बापूंचे मन भरून टाकूं लागला. प्रेमळपणें तिच्या पाठीवर हात फिरवीत ते म्हणाले, " बेटी, तूंच नीज--तूच दमली आहेस. किती वणवण करतेस ? "

बनू वडिलांच्या कुशींत शिरली व म्हणाली, " रागावलांत बापू ? "

" नाहीं ग ! पण आतां पुरे झाली ही परवड, हा प्रवास. "

" बापू , बापू-" बनू अश्रू ढाळीत म्हणाली, " नाहीं हो. मला खरंच एका जागीं, एकाजवळ जगणं जमणार नाहीं. मला सारं कळतं, पण काय करूं ? रागवूं नका ! "

मग कुणीच कांहीं बोललें नाहीं. जराशानें बनू पलंगावर पसरून शांत झोंपी गेली. पलंगाच्या काठीला डोकें टेकून बापूहि कशीबशी डुलकी देऊं लागले.

संध्याकाळीं दोघेंहि जागीं झालीं; एकमेकांचे डोळे चुकवूं लागली. 'अंबिका आश्रमां'त शांतता पसरली होती. तुरळक एखादा पॅसेंजर नोकराच्या नांवानें हांका मारीत होता. नळावर कपबशांचा ढीग पडला होता व जेवणघराला कुलूप होतें. बहुतेक लोक बाहेर गेले होते. वरच्या मजल्यावरची सव्वीस नंबरची खोली फक्त उघडी होती.

बापूंना वाटलें, बनू आतां भटकायला जाणार! पण ती आळोखेपिळोखे देत म्हणाली, "बापू, आपण पत्ते खेळायचे का?" बापूंना आश्चर्य वाटलें. आनंद वाटला. पलंगावर बसून बापलेकींचा पत्त्यांचा डाव सुरू झाला. दिवेलावणी झाली तरी ती खेळत राहिली. मग बापूंचा खेळ थांबला. बनूनें त्यांना औषध दिलें, दूध दिलें व निजवलें. आपली लेक इतकी काळजी घेते हें पाहून तो लुळा बाप वेडावून गेला. हळूहळू शांतपणें झोंपी गेला.

बापू केव्हां तरी रात्रीं जागे झाले. खिडकींतून उजेड येत होता. बंद दारांतून 'अंबिका आश्रमां'तले आवाज येत होते. रात्रीचे अकराबाराच झाले असावेत. आणि बनू जवळ नव्हती! खोलींत नव्हती! बापूंच्या छातींत धस्स झालें. नेहमीच ती अशी अपरात्रीं नाहीशी होई. पण तरी ते हवालदील झाले. उठून दाराशीं आले. पण दार बाहेरून बंद होतें. त्यांना दारावर धडका द्याव्यात असें वाटलें. पण त्यांना धीर झाला नाहीं. ओरडा करून काय फायदा? आपलेच दात नि आपलेच ओठ. आपल्याला असा हा अर्धांग अन् आपली लेकीवरची जिवापाड माया! ते परतले व भिंतीशीं कसेबसे उभे राहिले. पलीकडच्या खोलींतून बनूच्या हसण्याचा आवाज आला; अन् बापूंचें काळीज रक्तबंबाळ करून गेला. शेजारच्या बोहऱ्याच्या बाहुपाशांत बनू पडली होती! बापूंचें डोकें भिरभिरूं लागलें. त्यांना वाटलें, भिंत फोडावी, बनूला फोडून काढावें किंवा...किंवा विष खाऊन आयुष्यच संपवावें. पण ते कांहीं करूं शकले नाहींत. हें रोजचेंच

होतें. अन् मुलीवरची अफाट माया साऱ्यावर पांघरूण घालीत होती. ते कसे बसे खिडकीशीं आले. बाहेरचें मोकळें आकाश पाहतांच त्याचे डोळे भरून आले. त्यांचें आयुष्य, त्याच्या आकांक्षा, त्यांची मृत पत्नी, मृत आई . खिडकीच्या गजांवर कपाळ आपटीत ते ओक्साबोक्शी रडूं लागले. दुःख संपत नव्हतें, रडणं संपत नव्हतं, रात्र संपत नव्हती...

पहांटे बनूनें घाईनें खोलीची कडी काढली. व्हरांड्यांतून फौजदाराला वांटेला लावून ती आंत आली. जमिनीवरच झोंपलेल्या बापूंना म्हणाली, "बापू-उठा, उठा. नाशकाला जायचं ना ? गाडी चुकेल आपली. उठा - नाही तर मी जाईन !" बोलतां बोलतां ती सामान बांधत होती. साडी ठाकठीक करीत होती.

चहाचे कप घेऊन भार्गवराम तेवढ्यांत टपकला. बापू मोंडकर झोपलेले पाहून बनूला हलकेंच म्हणाला, "राहा कीं इथेंच. अंबिका आश्रम तुझ्या नावानं करतों-" त्याच्या हातून कप घेत बनूनें मान फिरवली. तिला भार्गवराम, अंबिका आश्रम, कांहीं नको होतें. डोळ्यांपुढें नाशकाची गाडी दिसत होती. घंटे दोन घंटे आगगाडीचा प्रवास. मग नाशिक. तेथला चिवडा, तेथला मालगुजाराचा तरुण पोरगा. मग पुढच्या गांवचा तो... उठणाऱ्या बापूंच्या हातीं तिने कांठी दिली. दारांत आलेल्या छोकऱ्याला सामान उचलायचा हुकूम दिला व ती तोऱ्यांत बाहेर पडूं लागली. तिची घाई बघतांच बापूंची त्रेधा उडाली. स्वतःचें शरीर कसेंबसें गोळा करीत ते ओढ लागून निघाले. "बनू, थांब. मला सोडूं नको. मी येतो बनू!" असें पुटपुटत सव्वीस नंबराबाहेर गेले.

—मोंडकर मंडळी गेल्यावर भार्गवराम रिकाम्या खोलीच्या उंबरठ्याशी उभा राहिला-टेबलावर पडलेले केसांचें गुंतवळ व औषधाची पुडी पहात. बनू एका जागेंत, एका हृदयांत रहाणारी तरुणी नव्हती. तिचा पिंडच प्रवासी बनला होता ! त्या विलक्षण मुलीला व तिच्या विचित्र बापाला त्यानें एक इरसाल शिवी हासडली. मग सांगून आलेल्या एका भिक्षुकाच्या विधवेशीं विवाह करून 'सव्वीस'मध्यें संसार थाटायचें त्यानें ठरवून टाकलें आणि खोलीला कुलूप ठोकलें ! ★ ★ ★

# जागरण

एका प्रतिष्ठित, प्रौढ व प्रवीण गिऱ्हाइकाला घेऊन व्हिक्टोरिया त्या जागरण करणाऱ्या रस्त्यावर खडखडत आली.

गाडीच्या पायरीवर पाय ठेवून केसांचीं झुलपें सांवरीत बच्चू उभा होता. कानांतली विडी त्यानें रस्त्यावर टाकून दिली होती व हातांतला भोंवरा चड्डीच्या खिशांत ठेवून दिला होता. मोठी माहितगार मुद्रा करून गाडींतल्या गृहस्थाला तो समजावीत होता—"साहेब, तुम्हाला फालतू चीज नाहीं दाखवीत. एकदम प्रायवेट आहे. परवांच आली आहे. गोरी आहे नि गरीब आहे. लागेल तेवढी मजा मारा..." बोलतां बोलतां तो शेंबूड पुसत होता व थाबून साहेबांच्या चेहऱ्याकडे आशाळभूतपणें पाहात होता. "चला शेठ माझ्यासंगं. मी खोटं नाही सांगत.नुसती पहा तर खरी पोरगी!"

चिरूट चोखत साहेब दुतर्फा असलेल्या नायकिणी न्याहाळीत होते. खिडक्या खिडक्यांत दिवे पेटले होते व डोकी उगवलीं होतीं. डोळ्यांनीं धांवत्या दृष्टिक्षेपांत मिळतील तितके चेहरे टिपत साहेब चालले होते. अन् त्यांच्या नजरेतला बारकासारका फरक बच्चूला व्याकुळ करीत होता. केवढ्या चपळाईनें त्यानें गाडींत उडी घेतली होती. सहज रुपाया काढून देणारं गिऱ्हाईक हेरलं होतं. वर सिग्रेटहि मिळायचा संभव होता. रुपायांत भोंवरा आला असता नवा आणि कुल्पी मलाई! कुठे तरी साहेबांची दृष्टि रेंगाळलेली दिसतांच तो उद्गारला, " तिकडे चला हवं तर! एकदम मस्त आहे माल. अरे, थांबव रे गाडी. "

पेंगणाऱ्या गाडीवानानें जनावर रोखत गाडी कडेला खडी केली. फूट-पाथवरचं उडाणटप्पूंचं टोळकं शिव्या देत दूर सरलं. गाडींतल्या इसमाला पाहून कुजबुजूं लागलं. कोपऱ्यांतला महारोगी फरफटत आवेगानें पुढें घुसला; दीनपणें दया भाकूं लागला. कुठुनसा अत्तरवाला टपकला. पेटी उघडीत म्हणाला, "एक एक अप्सरा छोट्याशा कुपींत! घ्या शेट, चमेली--हीना,

चाफा-गलाब, साग्रसंगीत लज्जद लुटा !" दूरवर असलेल्या मालिशवाल्यानें गाडी पहातांच केवळ संवयीदाखल साद दिली, "माऽऽलिश !"

शेपटी हालवीत लाडिकपणें भुंकणाऱ्या कुत्र्याप्रमाणें बच्चू फुटपाथवर उतरलेल्या गिऱ्हाइकापुढे गोंडा घोळत होता. त्याच्या डोळ्यापुढें आइस-फ्रूट नाचत होतं, सिनेमाचं तिकीट नाचत होतं. गिऱ्हाईक नवखं नसल्यानें आपणास हुसकून देईल अशी भीति व नवखं नसल्याने कदाचित् लवकर काम होईल अशी आशा त्याला अस्वस्थ करीत होती. मध्येंच डाव्या हातानें दुसऱ्या कडेला असलेल्या वाटाड्याला तो थोपवीत होता. मध्येंच डोळ्यांनीं गाडीवानाला खुणावीत होता. समोरचा वाटाड्या, शेठ आपल्या वाट्याला यायची वाट पहात होता, व गाडीवान गालांत हंसत गभीरपणें म्हणत होता, " जा साहेब. पोरगं फसवणारं नाहीं. इथलंच आहे."

अखेर मारुती नवसाला पावला. विजयी वीरासारखा बच्चू निघाला. एका निळ्या इमारतीच्या अरुंद जिन्याशीं घंटा वाजवीत म्हणाला, " या शेठ !" दारांतून डोकावणाऱ्या पहारेकऱ्याला तो म्हणाला, " मी आहें, उघड दार–" अन् गिऱ्हाइकाला पाठीशीं घालून तो ऐटींत वर गेला.

मग समोरचा बुड्ढा वाटाड्या दुडक्या चालीनें गाडीजवळ आला. कडू चेहरा करून तो म्हणाला, " गफूरमियाँ, गिऱ्हाईक गाठून द्यायचं कबूल केलं होतंत मला ! अन आज आलांत अन बच्चूची धन केलीत."

गफूर गाडीवाला आपली सफेत दाढी कुरवाळीत खालीं उतरला. आत्तां मिळालेल्या भाड्यानें त्याने सुटकेचा श्वास सोडला होता. सेंट्रलशीं, थेटराशीं, ग्रांटरोडवर, कुठेच फारसं भाडं मिळालं नव्हतं आज. स्वतःची पदर-मोड करून मालकाला पैसा भरावा लागणार होता. गेले दोन दिवस असाच कारभार चालला होता. घरीं सलीम बिठीयां तापानें बेजार होती. अन् पैसा टिकवल्याशिवाय डॉक्टर दवा द्यायला राजी नव्हता. आत्ताचीं नाणीं मालकाच्या बोडक्यावर घालावीं कीं डॉक्टराच्या बाटलींत टाकावीं ह्याचा विचार करीत त्यानें तीं खमीसाच्या खिशात सोडलीं व घोड्याला गवत दाखवलें. श्रमानीं व भुकेनें मूढ झालेल्या घोड्याने घांसाच्यां

वासानें नाकपुडया खिदळल्या व अधाशीपणें पिवळ्या दांतांत हिरव्या काड्या चघळण्यास सुरवात केली.

वाटयाड्या विमनस्कपणें तसाच उभा होता. अजून भोवानी झाली नव्हती. दहा वाजायला आले होते. खिसा रिकामा होता, पोट रिकामें होतें. लवकरच पावसाळा आला कीं गिऱ्हाइक घटणार व दमा वाढणार ही धास्ती सारखी छळीत होती. असंख्य पोरी खुराड्यातून भरल्या होत्या आणि अनेक पैसेवाले शेठ चोहोंकडून येत होते; पण आपल्याला दलाली मिळणं कठीण जातं ह्याचा त्याला विषाद वाटत होता. दोनतीन कुंटिणींशीं व दोनतीन गाडीवाल्यांशीं केलेला सौदाहि साधता येत नव्हता. गफूरच्या खिशाकडे व जनावराच्या खिंकाळण्याकडे तो कासावीस होऊन पहात होता.

गफूरमियॉनें घोड्याच्या पाठीवर थाप मारून म्हटलें, "मी तरी काय करूं बुड्ढे ! ते पोर भलतंच तेज आहे. केव्हा नि कुठे गिऱ्हाईक हेरतं कळतहि नाहीं. लाथा मारल्या तरी चारसहा आणे उपटल्याशिवाय रहात नाहीं. सलाम काय करतं, सिगरेट काय मागतं, यस्फयस् काय बोलतं ! बाप दंग्यांत मारला गेला नि आई पळून गेली, तेव्हां शेजाऱ्यापाजाऱ्यांना काळजी वाटत होती. पण हे शेंबडं कार्ट शेजाऱ्याचे संसारसुद्धां सहज चालवील !"

बुड्ढा वाटाड्या अर्धवट उद्गारला, "माझाहि कृष्णा दहा वर्षांचा आहे—"

गाडीवानानें ते ऐकले व म्हटले, "मग त्यालाच आणा इकडे. तुम्ही काय कमावणार ? तुम्हाला पाय उचलवत नाहीं नि फर्माशीत बात करता येत नाहीं. ह्या जवानीच्या बाजारांत वाटाड्याहि जवान हवा ! कसा आहे छोकरा ?"

बुड्ढा स्वतःबद्दलच्या वर्णनाने चिडला नाहीं. पण पोराबद्दलच्या सूचनेने डिंवचला गेला. "कार्टा आहे कोळीवाड्यांत काकाकडे. तिथं उकिरडेच फुंकतोय्, पण उपाशीं राह्यला तरी या नरकांत नको यायला. आम्ही पोट जाळतों तेवढं पुरें...."

गाडीवान लगाम धरून गाडी पुढें घेऊं लागला. वाटाड्या चालत मोठ्यानें बडबडूं लागला–" वीस वर्षं मी गिरणींत नेकीनं नोकरी केलीय्. कधीं खाडा केला नाहीं. कधीं खोटीं केली नाहीं. पण म्हातारा झालों तशी संपाचं निमित्त करून काढलं मला. पोटावर पाय दिल्यावर करायचं काय ? पांडुरंगाचं नांव घ्यायचं, तें पोरींचीं नांव घेतोंय्–" गफूरशी बातचीत करीत राहिलं तर अमळशानें त्याच्याबरोबर सिंगल चहा मिळेल ही आशा आंतड्यांत वळवळत होती...तेवढ्यांत समोरून एक तरुण इसम चाललेला दिसला अन् अवसान आणून बुड्ढ्यानं उडी घेतली.

" शेठ, काहीं टाखवूं का ? साहेब—" बुड्ढा बोळकं मोकळं करीत पाठलाग करीत होता व तो तरुण घाम पुसत फूटपाथवरून घाईनें चालत होता. समोरून ट्रामचा खडखडाट ऐकतांच भेदरून तो बाजूच्या गल्लींत घुसला. पानवाल्यापासून सिग्रेट घेऊं लागला.

पानवाला पक्का ओळखून होता कीं, सिगरेटची खरेदी नांवाला आहे. पिवळा हत्ती ओढणारा नाहीं हा सटबूटवाला. हा लाजत मुरकत, दबकत, घाम पुसत, चोरासारखा खिडक्या न्याहाळील. धडधडणारी छाती नि लालचावलेली मुद्रा घेऊन उगाच चकरा मारील. अखेर अख्खी पेटी कुठेंतरी टाकून देईल, अन असाच परत जाईल. वयांत आलेलीं कित्येक कारटीं अशा घिरट्या घालत असतात. पानवाल्याला वाटल, बुड्ढ्याला सांगावं हें !–आणि त्या तरुणालाहि समज द्यावी जराशी ! पण तो बोलला नाहीं. कुणाची समजूत घालायला, समज द्यायला, त्याला उत्साह उरला नव्हता. मुकाट्यानें पानें बनवावींत, विड्या काढून द्याव्यात, पुन्हा पानें बनवावींत...

दुकानाचं मखर करून पानवाला मध्यें बसला होता. तिन्ही भिंतींना लावलेल्या लाकडी कपाटांतून विड्यांची बंडलें, सिग्रेटची पाकिटें, उदबत्त्या, मेणबत्त्या, काड्याच्या पेट्या, नाना जिन्नस मांडून ठेवले होते. समोर ठेवलेल्या ताटल्यांतून व बाटल्यांतून मसाले व सुपारी घालून पट्ट्या तयार होत होत्या. भिंतींना नेहरू-सुभाषचंद्राचे चेहरे लटकत होतेच; पण.

हुतात्मा राजगुरूचें चित्रहि होतें व त्याला गंध लावलें होतें. सुलोचना सुरैयाचे फोटो होतेच; पण अष्टभुजेचीहि तस्वीर पूजा करून ठेवली होती. गळ्यांत धातूची पेटी अडकवून तो पेहेलवानी पानवाला भरल्या पोत्यासारखा बसला होता. यंत्रासारखा निर्विकार काम करीत होता. गंजलेल्या सुरीनें हिरव्या पानांना लाल कात फांसत होता...

डिलाईल रोडवरचा दादा अचकटविचकट गाणें म्हणत आला नि दुकानाशीं ठेवलेल्या मोडक्या खुर्चीवर बसला. पान खाऊन तो पिचकाऱ्या टाकूं लागला व गळ्यांतल्या रंगीत रुमालाच्या गांठी सोडूं लागला, बांधूं लागला. पानवाल्याला वाटलं, आपण पूर्वींचे उरलों असतों तर ह्या गुंडाशीं झगडावं लागलं असतं. पण केवळ परिस्थितीमुळें आज ह्याची मैत्री ठेवावी लागत आहे.

"काय बातमी आहे पानवाले?"

"कांहीं नाहीं. मागल्या गल्लींतल्या सुमेरसिंगाच्या सुनेनं स्वतःला पेटवून घेतलं दुपारीं. दागिन्यावरून झगडा झाला म्हणतात—"

"सुमेरसिंग भिसाडी? डोंगरीवरचा? साल्यानें खूप पैसा केला होता गोदीवरच्या चोरींत! पोलीस आले होते का?"

"तर! तिकडेच म्हैमू उस्तादाला लपवला होतात ना? फुकट सांपडला असता–"

"म्हैमू काय गवसतो! दुबारी बंदूक घेऊन बसलाय् तो!" दादा म्हणाला. "बंदुकींचं नि बाटल्यांचं राज्य आहे हा मोहल्ला म्हणजे अन् बायकांचं!...बाकी रंगवलेल्या बाया नुसत्या शोभेसाठीं, दिशाभुलीसाठीं. खरी दुनिया वेगळीच!"

शेजारच्या ज्यू वेश्येच्या घरांतली राधा कुणबीण पट्ट्या न्यायला आली तशी दादा गप्प झाला. सावधपणें, सभ्यपणें बसला. डोक्यावरचा पदर ठीक करीत, अंगासरशीं लपेटून घेत, उफाड्याची राधा गंभीरपणें म्हणाली,

"पट्ट्या द्या बांधून."

दादाच्या डोक्यांतून सट्टयाचे आंकडे व बेवड्याची बाटली नाहींशी झाली. राधेच्या सरळ व सच्च्या दृष्टीकडे तो टक लावून पाहूं लागला.

ह्याच चेहऱ्यासाठीं तो गुत्त्यांतले व खलबतखान्यांतले मित्र सोडून इथें येत असे. ह्याच स्त्रीसाठीं तो फॉकलंड रोडवरच्या रखमाक्काच्या मुलीकडे व पायधुणीवरच्या मालीशवाल्याच्या मुलांकडे जात नसे. ह्याच जीवापायीं तो आजकाल रात्रीं अपरात्रीं जागा होई, व दिवसा ढवळ्या खाटेवर पडून राही.

अन आज कित्येक दिवसानीं राधा त्याच्या पुढ्यात उभी होती !

तिची तिरसट वृत्ति पाहून त्याला बोलायचा धीर होईना. तिची जळती नजर व सणसणीत चप्पल त्याच्या परिचयाची झालेली होती. राधेशीं संधान कसं बांधायचं, समजत नव्हतं त्याला ! पैशाच्या लोभानें, चैनीच्या आशेने, साहसाच्या मोहाने, कशानेंच ती वळत नव्हती. कुठल्याहि नाठाळ पोरीला वठणीवर आणणं अशक्य नव्हतं ! अब्रू घेणं, पळवून नेणं...छे, राधेसाठीं असले अघोरी उपाय योजणं अशक्य होतं. तिचं दिल मिळवून, तिला मिरवत नववधूसारखी आपल्या मकाणांत न्यायची महत्त्वाकांक्षा दादाच्या हृदयांत ठाणं देऊन बसली होती !

दादानें डिवचलें म्हणून पानवाला पट्ट्या करतांकरतां म्हणाला,

" काय राधा, सालोमानबाईकडे बरंच गिऱ्हाइक आलेलं दिसतंय् . बोट आली आहे कीं काय बंदराला—"

" बोट कुठली ? अन खलाशी लोक पान कुठले खायला ?-ते नुसतं पान करणार ! "

राधा ठसक्यानें म्हणाली. दादा हंसत सुटला; पण राधेच्या कपाळावरच्या आंठ्या पाहून वरमून गप्प झाला. त्याला वाईट वाटलें, रागहि आला. जरा विचार करून तो एकदम म्हणाला,

" आम्हांला त्यांतलंच पान द्या हं, पानवाले ! "

पानवाल्यानें प्रश्नार्थक मुद्रेनें दोघांकडे पाहिलें. राधा चिडली व म्हणाली,

" माझीं रुपयाचीं पानं द्या बांधून ! पानं वांटणारी वाटेवरची वेश्या नाहीं मी. अब्रूदार घाटण आहें. पान नाहीं, पण पायतण देईन–"

गल्ल्याच्या पेटीवर रुपया टपकला. पानवाला पैशाहून मौल्यवान बोल ऐकून खूष झाला. कुठली तरी नऊ वारी पातळ नेसलेली चिमुरडी पोर

त्याच्या नेत्रांपुढें झरकन् तरळून गेली. पट्ट्याचा पुडा राधेच्या राठ हातांत टेऊन तो पुन्हा ती पूर्वायुष्यांतली पोर आठवूं लागला...

कासोट्याचा घोळ मांसल पोटऱ्यांवर खेळवीत राधा गेली. दादा खुर्चीवरून उठला व तिच्या अदृश्य होणाऱ्या आकृतीकडे पहात राहिला, उसासे टाकीत राहिला.

गंजलेल्या सुरीनें हिरव्या पानांना लाल कात फांशीत पानवाला कामांत गुंतूं लागला. जुन्या आठवणी चघळीत बसण्यांत अर्थ उरला नव्हता. त्यांत आनंदहि नव्हता. कृष्णाकांठची ती कोंवळी मुलगी अशीच कुठल्यातरी कुंटणखान्यांत कोंडली गेली होती. अशाच एका दगडी काळजाच्या दादाच्या नादीं लागल्यानें . जेव्हां आपण देशसेवेचं वेड घेऊन तलवारी-बंदुका जमवीत बसलों होतों तेव्हां ! ती देशसेवाहि अशीच अदृश्य झाली. आतां उरली फक्त गंजलेली सुरी, आणि दंडावरचा बजरंग ताईत. पान-वाल्यानें चमकून टांगलेल्या फोटोकडे क्षणमात्र पाहिलें त्याला वाटलें, ह्याच सुरीनें दादाचा, राधेचा, बुद्ढ्या वाटाड्याचा, साऱ्यांचा खून करावा !...

दरवर उभ्या असलेल्या दादानें समोरून येणाऱ्या फाटक्या इसमाच्या फाडकन मुस्काटांत मारली. आपल्याच नादांत खालीं पाहात जाणाऱ्या त्या इसमाच्या डोळ्यांपुढे काजवे चमकले. चिडून त्यानें पाहिलें. लाल डोळे करून दादा सैतानासारखा उभा होता. दादाला पाहतांच तो वरमला व परत खाली मान घालून गाल चोळीत गेला. दादाला आपल्या कृत्याचें आश्चर्य वाटलें. आईची व दोन बहिणींची शरीरविक्री करून त्यावर जग-णारा साधा, गरीब इसम होता तो ! त्याला मारून काय मिळालें ? दादा अधिकच चिडला. शेजारच्या गल्लींत टांगा टाकीत गेला व बैठ्या बंगली-पुढील पठाणाच्या खाटेवर बसून गुडगुडी ओढूं लागला.

अंमळशानें बंगलीचं सरकदार उघडून लचकतमुरकत, फूलवाला पोरगा बाहेर आला. खूप खुषींत होता तो. मालकिणीकडे आलेल्या शेठ लोकांनीं त्याला नाचायला सांगितलं होतं व त्याची थट्टा करून बक्षिशी दिली होती. आतां उद्यां उठल्यावर त्या पैशांतून तो खरेदी करणार होता. रेशमी स्कार्फ, प्लॉस्टिकचा कंगवा, खड्याची आंगठी, ...मुख्य म्हणजे महालक्ष्मीला

जाऊन आंधळ्या आजीला मिठी मारून येणार होता. तसंच, तिनें म्हटलंच तर दर्ग्यांत जाऊन माळ चढवणार होता.

रस्ता ओलांडतांना फूलवाला मध्येंच दचकला. समोरच्या फूटपाथपाशीं ते तिघेजण जीपमध्यें बसलेले होते. त्यांची गांठ पडली म्हणजे झालंच ! कांहींतरी कामगिरी गळ्यांत पडायची. धाकानें फुलं विकत घेणाऱ्या पोरींना भूल द्यायचं कृत्य करावं लागायचं. तो झटकन् पळाला; मुतारीमागें दडला.

तिघेजण हलक्या आवाजांत, मोडक्या उर्दूत कुजबजत होते.

" ...बंगलोरला रेस सीझनला पोरी पाठवायला हव्यात आतां. हैदरला चिठ्ठी पाठव, व्यंकय्याच्या घरांत व्यवस्था करायला..."

" पोरी आहेत कुठें पाठवायला ? आहेत त्या साऱ्या इथेंच लागतात. जुहुवर, माहीमला, बोरीबंदरवर, ताजपाशीं—"

" ताडदेवच्या घरांत कलकत्त्याहून आलेलीं त्या चायना टाऊनमधलीं आहेत ना पार्सलं ? "

" त्या नाहींत तयारींत अजून ! अफूचा मारा चालला आहे. पण त्या उंचेल्या बहिणींना अजून त्यांच्या प्रियकरांना भेटायची आशा आहेच—"

"साली अफूहि धड मिळत नाहीं. त्या फौजदारांना पगार वांटला कीं नाहीं ?—अन् दर्ज्याचं बिल कां वाढलं इतकं ? "

" बरेंच झगे शिवून घेतले. आपलं राज्य झालं तरी मडमाची मागणी कमी नाहीं होत—"

" ते बघ—ते बघ डाकू ! शंकऱ्या नि सुलेमान. मोहिमेवर दिसताहेत. हे लेकाचे चोऱ्या करून आपलं पोट जाळतात; अन् त्यांच्यामुळें आम्हांला निष्कारण तकलीफ होते. "

तिघेहि अस्वस्थपणें, ट्राममार्गावर चालणाऱ्या शंकऱ्या व सुलेमानकडे, बोलणें थांबवून पहात बसले. सुलेमान रखडत ढकलत निघाला होता. शंकऱ्या चित्त्याच्या सावधतेनें चालला होता त्यांच्या पुढेंच चाललेल्या गलेलठ्ठ गुजराथ्याचा पाठलाग करीत !

ट्रामच्या खडखडाटाचा फायदा घेऊन सुलेमान कुजबुजला, " साल्या, आतां नको !—जमायचं नाहीं. त्याला गर्दीत जाऊं दे ! "

शंकऱ्या त्याला दूर सारीत म्हणाला, " दोन तास पिच्छा पुरवलाय्· आतां अंगचटीला जाऊनच काम उरकायला हवं ! "

ट्राम दूर जाऊन शांत झालं, तशी निराशेनें, निर्वाणीनें सुलेमान म्हणाला, " पचणार नाहीं. पुन्हा जेलची हवा खावी लागेल. सहा वर्षें खडी फोडून कंटाळलोंय् मी—"

चाकूचं पातं चाळवीत शंकऱ्या घोगऱ्या स्वरांत चिरकला, " अन् सहा दिवस उपाशीं राहून गांजलों आहें मी—"

डाव्या हातानें सोंगा सांवरीत व उजव्या हातानें पिशवी सांवरीत गुजराथी वळणावरच्या इराणी उपाहारगृहांत घुसला. हॉटेलांत टेबलांशीं माणसं बसलीं होतीं, माशा बसल्या होत्या. चहाचे कप फिरवले जात होते, सोड्याच्या बाटल्या फुटत होत्या, मटणाच्या बशा भरल्या जात होत्या. भिंतींना मोठाले आरसे चिकटवले होते नि छताला रंगीत दिवे लावले होते. धडाक्यानें रेडिओ लावून लालबुंद इराणी मालक गल्ल्याच्या टेबलाशीं डुलक्या घेत होता.

हातांतली पिशवी गुजराथ्यानें इराण्यापुढें आदळली. खिशांतून सिग्रेटची पेटी काढली आणि म्हटलें,

" घ्या, माल घ्या !—सगळीं औषधं आणलीं आहेत ऑर्डरप्रमाणें. "

इराण्यानें डोळे किलकिले करीत पाहिलें. सावकाशीनें तो म्हणाला,

" काय, इथली वस्ती हलणार म्हणे ! " गुजराथ्यानें काडीनें कान कोरले आणि तुच्छतेनें म्हटलें, " कित्येक दिवस ऐकतोंय् ही बातमी. वस्ती हलवली तर उलट शेट लोकांचाच तोटा होईल. त्यांनाच आपल्या चैनीसाठीं दूरवर गाड्या करून जावं लागेल. तुमचाआमचा उलट फायदाच होईल. आमचा दवा अधिक खपेल. तुमचं हॉटेल अधिक चालेल. आपल्या सगळ्यांचाच फायदा होईल—"

" बराबर आहे ! " इराणी पुन्हा डोळे बारीक करीत उद्गारला, " ह्या बायक्या जोंवर आहेत तोंवर धास्ती नाहीं आणि ह्या बायकावर बंदी होणं शक्य नाहीं. भुलेश्वरला, भेंडीबाजारला, गांवदेवीला नि ग्रांटरोडला पैसेवाले शेटसावकार आहेत तोंवर हा फोरासरोड राहणारच !

अन् शेठसावकारांना नि नायकिणींना जोडणारा आपला मध्यमवर्गहि टिकणारच—"

"वा, वा ! तुम्ही तर तत्त्वज्ञान बोलूं लागलांत !"

"मग ? ग्रॅज्युएट आहें मी ! इथें हॉटेल असलं म्हणून काय झालं ? कोटांतलं 'काफे कल्चर' हि माझंच आहे."

गुजराथ्याला गंमत वाटली. सिग्रेटचा धूर सोडीत तो गुंगून उभा राहिला. टेबलाभोंवतीं धूर सांचूं लागला. अन् बिलं देणारीं, मोड मागणारीं, गिऱ्हाइकेंहि !—कुणी तरी चहाचे पैसे दिले. एकानें सिग्रेटचें पाकिट परत केलें. शंकऱ्यानें खोट्या रुपयाची मोड मागितली. सुलेमान अॅस्प्रोचं पाकिट विचारूं लागला...

कोपऱ्यातल्या टेबलाशीं बसलेला कुणी काटकुळा, कुरूप इसम खिसे कापण्याचें प्रात्यक्षिक पाहून खूष होऊन गेला. मघाशींच त्यानें झरीनाच्या घराच्या बंद दाराशीं कान देऊन आंतल्या पोरींच्या दबलेल्या किंकाळ्या मिटक्या मारीत ऐकल्या होत्या. गानेवाली अख्तरजानच्या दिवाणखान्यांतली हमरीतुमरी फुटपाथवरून मनसोक्त पाहिली होती. दिवसभर असाच आंकड्याचा खेळ, जादूचे प्रयोग, अपघाताची पोलिस चौकशी पहात वेळ घालवला होता अन आतानें शकऱ्याच्या चाकूचें तेज पाहून तर तो दिपून गेला. आपला कळकट चेहरा त्यानें प्रेमळपणें कुरवाळला आणि बरोबर आणलेल्या तीनचार वर्षांच्या उपड्याबंब मुलीचे केंस तो उपटूं लागला. ती मुलगी रडूं लागली, ओरडूं लागली, तशी त्याला हंसूं फुटलें. तो तिला चिमटे घेत, चावत, अधिकच सतावूं लागला.

तितक्यात समोरच्या निळ्या इमारतीच्या अरुंद जिन्यांतून एक पोक्त गृहस्थ घाम पुशीत बाहेर आला. तो हिडीस इसम तिकडे आसासून पहात राहिला. तो गृहस्थ हॉटेलांतच येऊन शेजारच्या टेबलाशीं सुस्कारा टाकीत बसला व त्यानें सोड्याची ऑर्डर दिली. त्याचा सुस्कारा सोडणं, घाम पुसणं, संथपणें सोडा मागवणं, त्या हिडीस इसमाला अति आवडलं.

सोड्याचा ग्लास आणून ठेवत पोरगेला वेटर म्हणाला, "साहेब, तुम्ही सिनिमांत आहांत ?" इन्कमटॅक्स कचेरींतल्या त्या गृहस्थानें दचकून पाहिलें..

तो केस वाढवलेला, डोळे खोल गेलेला, बावळट वेटर पाहून त्यांनीं तोंड फिरविलें व सोडयाचे घुटके घेतले.

वेटर वरमला नाहीं. टेबलाच्या दुसऱ्या दिशेनें पुढें सरकत तो अजीजीनें म्हणूं लागला, " निदान सिनिमांत ओळख आहे का तुमची ? मला सिनिमात काम करायचं आहे हो ! तेवढ्यासाठीं मंगळूरहून आईबापांना सोडून पळून आलों. आज चार वर्षं झालीं साहेब ! इथें घाणींत पडलों आहें. पहा कुठें चिकटवतां आलं तर !—मला याकूबमारखं ॲक्टिंग येतं. हें पहा माझं पिक्चर—"

डोक्यावरची मळकी टोपी काढून त्यांतला तेलकट फोटो तो काढूं लागला. तेवढ्यांत दुसऱ्या कोपऱ्यांतून कुणी ओरडलें, " अबे लौंडे, चहा लाव जल्दी ! "

चहाच्या कपाची चवड कोपऱ्याकडे नेण्यात आली. कढत घुटके घेत कोंडाळं करणारी डोकी बडबडूं लागलीं. सट्टा, स्टॅटपट, रेमचे घोडे, घरफोडीचे किस्से, भोसकाभोसकीच्या बातम्या ! सगळ्या विषयांवर सगळींजणं बोलत होतीं. आंकड्यांच्या चिठ्ठ्या पोंचवणारा गोवेकर,कसल्याहि कुलपाच्या किल्ल्या बनवणारा पुरभय्या, थोड्या सामुग्रींत दारू गाळणारा कोंकण्या, जादूटोणा-मंत्रतंत्र करणारा मद्रासी, कांहींच न करणारे नि कुठलंहि काम करूं शकणारे बिनजातवाले—अचकट बोलत, ओरडा करीत केवढा वेळचे बसले होते.

थोड्या वेळानें रस्त्यावरून जाणाऱ्या सरबतवाल्यानें गाडीच्या खालीं लटकवलेली घंटा जोरानें दोनदां वाजवली. ती सूचना मिळतांच सारे चूप झाले. चहा पीत टेबलावरचीं वर्तमानपत्रें चाळूं लागले, विड्या पेटवूं लागले. एकजण लगबगीनें उठला व कडेच्या दारानें बाहेर पडला. खिशांतल्या सट्ट्याच्या चिठ्ठ्या त्यानें बाजूला बसलेल्या भिकारणीच्या वाटींत भिरकावल्या व तो नाहीसा झाला.

भिकारीण भडकली. ती म्हातारी होती म्हणून, लंगडी होती म्हणून, तिला कुणी दानधर्म करीत नव्हता. ती तरुण असती तर...भिकारीण दचकली, पुन्हा भडकली. तिला वाटलं, बाजूनें शीळ घालीत जाणाऱ्या फौज

दाराला सारं सांगावं. पण एका फौजदारानेंच तिला चांगल्या वस्तींतून हांकलून इथें सोडलें होतें. तिला वाटलं, ट्राममध्यें चढावं, त्या दादरच्या स्वच्छ वस्तींत भीक मागावी, आगीनगाडींत बसून घराला जावं व नातवंडं खेळवावींत किंवा... किंवा सरळ समोरच्या माडींत शिरावं, खूपसा रंग फासून छानसं लुगडं नेसून नाचावं,नव्यानव्या माणसांना मिठ्या माराव्यात !- पण ती तिथेंच, तशीच बसली—माडीच्या खालीं, ट्रामच्या कडेला ! इथले इतर अनेक लोक गाड्यांच्या नि माड्यांच्या मध्यें घुटमळत जेमतेम जगत होते, तशी—

मग दूरवरून गिऱ्हाईक घेऊन एक व्हिक्टोरिया खडखडाट करीत येऊं लागली आणि जागरण करणारा तो रस्ता आणिक एकवार आळस झटकूं लागला.

* * *

# सुरसग्रंथमाला. ( पंढरपूर )

फक्त एक रुपया प्रवेशफी भरून कायमचें वर्गणीदार होतां येतें.
खालील पुस्तकें आमच्या ग्राहकांस ¾ किंमतीस मिळतील. ट. ख. वेगळा.

## जुनीं प्रकाशनें

| अ.नं. | नांव | | रु. आ. पै |
| --- | --- | --- | --- |
| ९ | जर्मन मोहीम, गहनगूढ, प्रेमपरीक्षण | ... ... | २–१०—० |
| १० | सत्यमेव जयते व शैशव सहचरी | ... ... | २—०–० |
| १९ | पितृप्रेम ( नाटक )—परांजपे | ... ... | ०—१०–० |
| ४१ | दैवदुर्विपाक व भयंकर भूल—सव्यसाची | ... | ३—४—० |
| ४४ | मृगेंद्रलीला–प्रभंजन | ... ... ... | ३–१२—० |
| ४५ | ईश्वरी लीला व आशानिराशा—नरवणे | ... | ३–१२—० |
| ४६।४७ | प्रेमाश्रम, भाग १।२—प्रभाकर... | ... | ७—०—० |
| ४८।४९ | वीरात्मा, भाग १।२–गणेशशास्त्री फाटक | ... | ७—०—० |
| ५२ | विजयनगरची साम्राज्यस्थापना—दातार | ... | ३—८—० |
| ५३ | कुमार अशोक—लिमये | ... ... ... | ३—४—० |
| ५४।५५।५६ | जगाचा बाजार, भाग १।२।३ एकत्र... | | ९—८—० |
| ५७ | ढोंगी गुरूच्या सैतानी लीला–गणेशशास्त्री फाटक... | | ३—८—० |
| ५८ | हा संशयाचा प्रताप—ग. वि. कुलकर्णी... | ... | ३—८—० |
| ६० | भाईबंद व नराचा नारायण—दातार | ... ... | ३—४—० |
| ६२ | प्रेमबंधन—दातार | ... ... ... | ३—८—० |
| ६३ | प्रतापादित्य—वा. शि. हडकर | ... ... | ३—८—० |
| ६४ | देवी कल्याणी—अज्ञात | ... ... ... | ३—८—० |
| ६५ | भीषण सूड—अज्ञात | ... ... ... | ३—४—० |
| ६६ | अमृत कीं विष—हडकर | ... ... ... | ३—४—० |
| ६७ | रत्नगडची रंभा—सहृदय | ... ... ... | ३—४—० |
| ६९ | रक्ताचें गालबोट—परांजपे | ... ... ... | ३—४–० |
| ७१ | देशभक्त अनंतवार— | ... ... ... | १—०—० |
| | लंडन येथील बड्या लोकांचीं गुप्त कृत्यें, गोष्ट ३ री | | ५–०–० |

| | | |
|---|---|---|
| ७२ | गृहदेवी--प. स. देसाई ... ... ... | २--०--० |
| ७३ | भावकला—ल. रा. पटवर्धन... ... ... | २—०—० |
| ७४ | धरणीकंप—वि. वा. हडप ... ... ... | २—०—० |
| ७५ | कॉटनफिगर—अनंतवार ... ... ... | ०-१२—० |
| ७७ | उमाडलेल्या भावना—कवठेकर ... ... | २--०—० |

## नवीं प्रकाशनें

| अ.नं. | नांव | रु. आ. पै |
|---|---|---|
| ८४ | गोषांतील सुंदर स्त्रिया--वा. रा. कोठारी ... | ५—०—० |
| ८५ | ओझरती नजर—के. मा. नाईक ... ... | ४—०—० |
| ८६ | गृहिणी—अनुवादक गं. भा. निरंतर ... ... | ३—०—० |
| ८७ | छत्रसाल (संक्षिप्त)—वालचंद शहा ... ... | ४—०—० |
| ८८ | भिरभिरे—गंगाधर गाडगीळ ... ... | ३—०—० |
| ८९ | तूं भेटायला नको होतास—सरोजिनी बाबर ... | ३—०—० |
| ९० | मायेचा पाझर—शांता शेळके ... ... | ३--८--० |
| ९१ | मीलन-अरविंद गोखले ... ... | ३--०--० |
| ९२ | सम्राट् अशोक—वालचंद शहा ... ... | ६--०—० |
| ९३ | सर्व हक्क स्वाधीन — बोकील ... ... | ४--०--० |
| ९४ | मूकबळी—सुरेश शर्मा ... ... | २—०—० |
| ९५ | मदिरा-मस्तानी--आर. एल. भांगरे ... ... | २--८—० |
| ९६ | पाटणची प्रभात-मो. ग. व्होरा ... ... | ६--०—० |
| ९७ | पूर्व आणि पश्चिम--शांतिलाल भंडारी ... ... | ४--८--० |
| ९८ | वैरपूर्ती-सरस्वतीभक्त ... ... | ८--०--० |
| ९९ | अर्लामनार-पद्माकर डावरे ... ... | ३--०--० |
| १०० | जीवन-नृत्य—मीनाक्षी साने ... ... | ३—८—० |
| १०१ | गुजराथचा नाथ—ल. र. भिडे ... ... | ६—०—० |
| १०२ | बजाजी निंबाळकर-वालचंद शहा ... ... | ४—०—० |
| १०३ | दैवाची विचित्र लीला ( नौकाडुबी )-कै. टागोर | ५—०—० |

पाटलाची लेक
काावळा व ढाप्ली-म. चिं. केळकर } छापत आहे

